णा प्रकाशन २९

# पाथेय

[लघुकथा-संग्रह]

वामन चोरघडे

विजयादशमी
शके १८६८

मूल्य अडीच रुपये

संपादक

**ब. गो. गर्गे,** एम. ए.,

**द्वा. वा. घाटे,**

बी. ए., एलएल बी.



प्रकाशक :

**र. गो. गर्गे,** एम ए,

**वीणा प्रकाशन,**

सीताबर्डी, नागपूर.

प्रथमावृत्ति

आक्टोबर १९४६

मुद्रक :

**पां. ना. बनहट्टी,**

नारायण मुद्रणालय,

धनतोली, नागपूर.

मालियें जेउतें नेलें ।
तेउतें निवांतचि गेलें ।
तया पाणिया ऐसें केलें ।
होआवे गा ॥

—ज्ञानेश्वरी १२।१२०

## हांक

आभाळ भरून आलें.
मनहि आसावलें.
माझ्या जीवाच्या पांखरा, तूं कुठे गेलास ?
किति सांगितले तुला मी ! पण...
ये, ये, लवकर घरी ये.
हे पहा आकाशांत मृगाचे मेघ जमले आहेत.
काळे, काळे, विशाल.
विजा लवतात.
आणि ही गर्जना !
प्रकाश जीवापर्यंत भिडतो.
आणि त्याची असह्य दीप्ति.
वारा भणभणतो.
वत्सल भाव उडून जातील इतका सोसाटा.
कुणाच्या आसऱ्याला गेलास तूं ?
जवळ तुझ्या नव्हतें पाघरुण, नव्हतें पाथेय !
ये ये राजा—
थकला असशील, भागला असशील.
निवारा शोधीत असशील.

## ६

ये, ये !

हे पहा, माझ्या हृदयाचे बंध खुलले.

हे पहा, तुझ्या निवाऱ्याचे दार उघडले.

शरीराच्या रुचिर सौधाने रक्षिलेले हें उबदार घरटे.

तुझेंच तें.

सुखासाठीहि तुझ्याच.

ये—

आणि हवें असल्यास माझे सर्वस्व घेऊन टाक उबेसाठी !

आणि अगत्यच असेल तर अमळ विसावून तुझा पुनःप्रवास चालू दे.

—मृगनक्षत्र

७-६-४३.

# अनुक्रम


| | | | | |
|---|---|---|---|---|
| १. | जीवनशुद्धि | ... | ... | १ |
| २. | संस्कार | ... | ... | ३ |
| ३. | तिच्या आईचें अक्षर | ... | ... | १४ |
| ४. | परिवर्तन | ... | ... | २८ |
| ५. | जीवनधर्म | ... | ... | ३९ |
| ६. | अतिथि देवो भव ! | ... | ... | ५० |
| ७. | स्नेहदीप | ... | ... | ६६ |
| ८. | पाणथळ | ... | ... | ७८ |
| ९. | सन्मार्ग | ... | ... | ८७ |
| १०. | पराभव | ... | ... | ९९ |
| ११. | हादरा | ... | ... | १०८ |
| १२. | पुनर्जन्म | ... | ... | १२७ |
| १३. | तीनशें दोन | ... | ... | १४४ |

# श्री. वामन चोरघडे
## यांचीं पुस्तकें

**ललित**

१. सुषमा (लघुकथा संग्रह)
२. हवन ( ,, )
३. यौवन ( ,, )
४. प्रस्थान ( ,, )
५. पाथेय ( ,, )
६. चंपाराणी ( लोककथा )
७. प्रभावती ( ,, )

**इतर**

१. मराठी-हिंदुस्तानी कोश.
२. साहित्याचें मूलधन ( लोकसाहित्य चर्चा )
३. साने गुरुजी ( एक जीवनदर्शन )
४. आचार्य कालेलकर ( ,, )

## १ जीवनशुद्धि

आमच्या नागपूरच्या तेलंखेडीच्या तलावावरील रम्य सायं-काळ. देखावा मनाला ओढ लावणारा, पण उदास करून टाकणारा. तीन बाजूंनी जंगल. अंधार पडलेला. तलावाचें पाणी काळें झालेलें. पाण्यांतील कोंबडया वर उडत, आणि आकाशांत ओळीने, थव्यांनी घिरटया घालीत. चित्रविचित्र अशा त्यांच्या आकृति! पंखांची सळ-सळ आणि खालीं येऊन एकदम त्या पाण्यांत पसरत. अगदी थवाच्या थवा. सगळया एका हारीने उडत. एका हारीने पाण्यांत पसरत!

काठावरील दगडावर काळी आकृति. भेसूर काळी सावली. उदासवाणें तिमिरचित्र! एका स्त्रीचें. ती दगडावर फडाफडा धुणें आपटीत होती. पाण्यांत ओला पिळा बुडवायचा, आपटायचा, पुनः त्यांतलें पाणी काढून टाकायचें. प्रत्येक हालचालींत घाई.

सायंकाळ. पोरें घरीं कदाचित् रडत असतील. ज्याला सुसंस्कृत भाषेंत पति म्हणतात, तो आला असेल. भाकर तुकडा झाला नसेल--

आणि ही इथे घरांतील चिंध्या फडफडत होती. घाई करणार नाही तर काय? मुलांची माया. नवऱ्याची भीति!

पुनः स्वतःबद्दल कांही म्हणायचें नाहीच. स्वतःचा त्रास ? पण सगळाच जबरीचा त्याग. त्याला नांवें कुणी ठेवावीं ? आणि समर्थन तरी कसें करावें ?

कसें विचित्र ! 'कपडे' स्वच्छ व्हावेत म्हणून ते 'जीवनां' त बुडवायचें. पुनः त्यांतलें 'जीवन' घासून, पिळून, सुकवून, घडी घालून नाहीसें करावयाचें—अशाने 'वस्त्र' स्वच्छ होतें.

आणि हा मनाचा मळ धुवायला काढला तर ? पण तो बुडवायचा कशांत ? आणि सुकवायचा कशाने ?

नागपूर, ८-३-४१.

## २ संस्कार

तिच्या तेरा वर्षांच्या कोवळ्या अंतःकरणांत जी ज्योति त्या वेळीं होती ती आता असेल किंवा नाही मला माहीत नाही पण अनुमानाने कांही गोष्टी सिद्ध होण्यासारख्या असतील तर अजूनहि ती ज्योति मालवायला तिने कांही एक कारण घडूं दिलें नसावें असें वाटतें.

आणि त्या वेळीं तर तिचें अंतःकरण मृदु असूनहि गुलाब-कलिकेसारखें होतें. अंतरींचा प्रकाश तिच्या मुखावर खेळत होता की, मुखाची दीप्ति हृदयांत फाकली होती कुणास ठाऊक. पण सलीमाचा एक मात्र अढळ विश्वास होता, मुख प्रसन्न असलें तर मन नक्की प्रसन्न असतें.

माझ्याच शाळेंत असूनहि तिचा सहवास मला फार उशीरा घडला. आमच्या अनवर पाटलांची ती मुलगी. अनवर अब्बा नांवा-चेच मुसलमान. त्यांच्यांत दुर्गुणाचें नांव नव्हतें. त्यांचें दुकान आम्हांला आमचें दुकान वाटे आणि अनवर पाटलांनीहि आमचा दुजाभाव कधी केला नव्हता. एकदा तर त्यांनी मोहरमच्या सणांत

माझ्या अंगाला रंग लावून मला वाघ बनवून नाचायला लाविलें होतें. त्या रुपड्यांत मी माझ्या घरीं आंगणांत येऊन नाचूं लागलों, तों काय! मी बोलेसतोंवर मला कुणीं कुणी ओळखलें नाही. आईचा आपलें मूल ओळखून काढण्याचा अभिमान त्या दिवशीं बराच जिरला.

अनवर पाटलांचें घर मात्र आम्हांला वर्ज्य होतें. मुसलमानांच्या घरीं हिंदूंनी जायचें नसतें असा माझ्यावर संस्कार होता. त्यामुळेच सलमा मला दिसली ती एकदम शाळेंतच आणि ती प्रथम बोलली तो प्रसंग ?

आत्मस्तुतीचा क्षण जसा माणसाला सुख देतो तसेंच आत्मनिंदेनेहि कधी कधी बरें वाटतें.

प्रायमरी मराठी शाळेंत मी जात असे. शाळा म्हणजे एक मोठ्या उंच पडलेल्या किल्ल्याच्या खिंडारांतील एक खोली व त्या समोरच पडवी आणि बाहेर खूप विस्तीर्ण मैदान आणि आवार. त्यांत दूधमोगऱ्यार्ची पाढरीं स्वच्छ फुलें फुललेलीं. पहांटे तोडलीं तर त्यांचा मादक मंद गंध मनाला भुरळ घालून जाई. शाळेच्या खोलींत दोन वर्ग असत. खोली लांब होती. एका कोपऱ्यांत मराठी चौथी आणि दुसऱ्या टोकाला उर्दू. बाहेरच्या पडवींत मराठी दुसरी आणि दुसऱ्या कडेला उर्दू दुसरी. मी मराठी दुसरींत होतों. सलमा उर्दूत होती आणि त्याच वर्षी येऊं लागली होती.

खेड्यांतील मुलगी. अनवर अब्बांचा पानमळा होता. मोकळ्या हवेंत सलमाचे दिवस जात. घरीं खाणें पिणें व्यवस्थित. त्यामुळें अंगाने आम्हां खेड्यांतील मुलांसारखी ती पण थोराड दिसे. आजच्या

संस्कृतीच्या तुलनेने सांगायचें म्हणजे ती चांगली सोळा वर्षांची दिसे. उंचपुरे गात. शरीरावर यौवनाच्या खुणा उमटत असलेल्या. रेशमी निळा पायजामा आणि वर फुलांचा मदरा व फडकी पांघरून ती शाळेंत येई. रूप तिचें नितळ होतें. डोळयांत संकोच नव्हता. गहरी नजर पण निष्पाप होती. बोलतांना नाकांतील लाल मोती हलत असे आणि त्याचे इवलेसे किरण तिचे ओठ आपल्याकडे ओढून घेत. चेहऱ्यावर देवीचे व्रण होते चारदोन. पेरूला वाघळें कधी कधी चोचेने टोचतात आणि त्याचें सौंदर्य वाढवितात. कोवळया पालवीने भरलेल्या वृक्षावर चांदणें नाचतें तसें तिचें मंदमंद स्मित! झाडावर जसें सोनचाफ्याचें फूल तशी ती मुलांत बसलेली असे. उर्दू शाळेंत मुलें मुली एकत्र शिकत. खेडयांत असेंच असतें. शिक्षक म्हातारे, पितृतुल्य. मुलामुलींनाहि कसलाच तिथे संकोच, भीति वाटत नाही. सलमा त्या कोपऱ्यांत बसून मुनीर मास्तरांजवळ अलिफ बे, पे, से, म्हणत बसे. आम्ही इकडे आमच्या मास्तरांच्या अध्यक्षतेखाली 'रामाने आपला पोपटाचा पिंजरा पुढल्या दारीं टांगला होता,' अशी पोपटपंची करीत असूं.

सलमाकडे वारंवार लक्ष जाईल, धडयांत, खेळांत किंवा घोडयांत त्यामुळे व्यत्यय येईल अशी मनःस्थिति त्या वेळीं मुळींच नव्हती. सबब तिचा तिकडे अभ्यास चाले. आमचा इकडे अभ्यास चाले. मधली सुटी झाली की उन्हांत आम्ही गोटया खेळत असू. सलमा पडवीच्या खांबाशी टेकून आमचा खेळ पहात असे.

विजयाचा उन्माद मला त्या वेळीं सतत हवा असे. एकदा

गोटया खेळतांना माझी मार्क्याची गोळी हुकली. मुलें हसलीं. मीं चिडेनें इकडे तिकडे पाहिलें. सलमालाहि हसूं आलेंसें दिसलें. तिचे हसरे डोळे विस्फारले होते.

मग काय ! तिच्याबद्दल अढी बसयला तेवढें कारण पुरें होतें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ८ वाजतां ती शाळेंत आली. अंगणांतून येत होती. आमचें टोळकें पडवीखाली पाय टाकून अंगणाकडे पहात बसलें होतें. बरी सापडली सलमा. मास्तर नाही आले अजून. ठीक, आमचेंच राज्य. सुंदर असेल, आपल्या घरची. मोटी असेल, पाहून घेऊं. मलाहि जिवाला जीव देणारे दोस्त आहेत. हे साधे सुलभ विचार आणि आम्ही तीन चार जणांनी बाजारच्या चव्हाट्यावर ऐकलेल्या अशा शेलक्या रंगेल ललकाऱ्या मारून ' हायरे ' केलें की त्यांतला अर्थ न उमगूनहि सलमा जिरल्यासारखी झाली व चेहरा पाडून वर्गाच्या जागीं जाऊन बसली. मीहि विजयोन्मादांत मुलांना पाटीवर गणित घ्यायला सांगितलें. कप्तान होतों मी वर्गाचा !

मधली सुट्टी झाली. गोटया भराभर आंगणांत पडल्या. सलमा खांबापाशी येऊन उभी राहिली. तेंच हास्य, तीच प्रसन्नता, किंचित् गांभीर्य. डोळे थोडे अभ्राच्छादित.

मीं भराभर गोटया उडविल्या आणि " बीस की चोट " मारून राज्य जिंकलें. इतर गडी खेळायला गेले. मला काम नव्हतें. माझ्या दोन्ही मोठया गोटया मी आकाशांत उंच उंच फेकीत वेळ घालवूं लागलों आणि छपरीच्या सावलींत आलों. सलमा जवळच उभी होती. तिनें शांतपणें मला तिच्याकडे येण्याची खूण केली—

हिलाच आपण आज शिव्या दिल्या, चिडविलें—

छे, जाणें शक्य नाही. मन खोटेंच म्हणूं लागलें–'मी काय डरतों तिला ?' पण पाय उचलेनात. पुनः गोटी वर फेकली. जणूं ऐकलेंच नाही.

तिने हळूच पण स्पष्ट अशी हांक मारली.

पुनः हाक मारली.

गेलें पाहिजे. मुलगी हाक मारते आहे. गेलं पाहिजे.

चेहरा बेफिकिर. जणु आता एक मोठा वाघ मारून आणला. मन मात्र ससासारखें. गेलो नि सलमाच्या समोर उभा राहिलों.

" काय ? कशाला बोलविलेंस ? "

" तुला नीट ऐकायला येत नाही कां ? "

" कां ? "

" मी तुला तीन हांका मारल्या ! "

ही अशा रीतीने जिरविणार कां माझी ? ठीक आहे. पाहूं या.

" मला फालतू गोष्टी ऐकायला येत नसतात. "

" अरे, पण तुझेंच नांव घेत होतें मी, तें फालतू नाही ना ? "

आणि निरागस स्पष्ट हसणें. आम्हीं मारलेला वाघ मेलेला होता हें लक्षांत आल्यासारखें माझें तोंड झालें.

" बरें, पुढे, कशाला हांक मारली ? दिसत नाही मला राज्य घ्यायचें आहे माझें तें ? "

" घेशील रे. अन् हें गोटयांचें राज्य. दुसऱ्याला देतां पण येतें. देऊन टाक ना कुणाला जरा —"

" हं. फुकटचेंच तर आहे."

" बरं, नको देऊं. आज सकाळीं मी येतांना अभद्र बोललास तो तूंच ना ? "

अशा वेळीं चक्क नाही म्हणतां म्हणतां माझें मन निर्दावलें होतें. पण त्या वेळीं तें तयार झालें नाही नाकबूल करायला. मनांतला ससा थरारला आणि चेहराहि त्यामुळे थोडा पडला माझा. तथापि—

" पण तुला त्याची पंचाईत ? "

" म्हणजे ? मलाच अभद्र बोललास आणि मलाच पंचाईत नको ? मग कुणाला तुला ? काय बोललास तें तर सांग ? अर्थ काय त्याचा ? "

" असेल कांही तरी, मलाहि माहीत नाही, बरं मी जातां. "

" थांब थोडा, कां दिल्यास मला शिव्या तूं ? मी गुपचुप येत होतें म्हणून ? "

" त्या दिवशीं तूं मला हसलीस गोटी हुकली तेव्हा ? "

" मग त्यांत काय झालें ? मी पाय घसरून पडलें तर तुला नसतें कां हसायला आलें ? हा कुठला तुझा स्वभाव की तुला अपयशाच येऊं नये आणि दुसऱ्या कुणाला यशाच मिळूं नये ? आणि मुलें हसलीं तीं ? "

" तीं हसलीं तर हसलीं पण तूं हसायचें नव्हतें ! "

" असेंच मी म्हणतें. इतरांनी दिल्या तर दिल्या शिव्या पण तूं अभद्र बोलायला नको होतें. "

"मी फार थोड्या दिल्या. इतरांनीच तुला पुष्कळ शिव्या दिल्या. त्यांना म्हण ना!"

"पण तूं कां दिल्यास ? तें मला मुळीच आवडलें नाही."

"तें का ?"

"कारण तूं सुंदर आहेस. तुझी आई तुझे कपडे स्वच्छ धुते पण तूं ते कपडे येथे घाणेरडे करतोस. तुला देवाने चांगलें मन दिलें पण तें तूं इथें खराब करणार आहेस. तुझा चेहरा सुंदर आहे पण तो तूं बिघडवणार!"

मी तिच्याकडे पाहिलें आणि बोलेतोंवर पहातच राहिलो.

"तुला माहीत आहे, वाईट वागलें म्हणजे आपलें मन वाकडें होतें आणि मग चेहराहि वाईट होतो. माझे बाबा मला विचारतात, तुझ्या शाळेंत कोण कोण येतात ? मी त्यांना तुझें नांव सांगतें. तुझें वर्णन करतें. तुझे सुंदर दात, उंच उंच बांधा, काळेभोर केस, सगळें वर्णन करतें मी. त्यांना काय असें आता सांगूं मी की तुझ्यासारखा सुंदर मुलगा अभद्र, वाईट बोलतो ? त्यांना किती वाईट वाटेल तुला माहित आहे ?

"बरें, माझ्याबद्दल तूं कधी तुझ्या आईला सांगून पहा. तुला असेंच सांगावें लागेल की सलमा नांवाची मुलगी आमच्या शाळेंत आहे. ती सुंदर आहे, चांगलीहि आहे. ती नेहमी हसते. आमचे खेळ पहात निमुटपणे उभी असते. खेळतां खेळतां तिच्या वर्गात आमची गोटी गेली तर ती आणून देते. आम्हांला मदत करते—"

ती थोडी थांबली. मी तिच्यावरून माझी दृष्टि खाली केली. तिच्या पायांत काळ्याभोर सपाता होत्या. तिची तलम ओढणी हवेंत लहऱ्या मारीत होती. ती पुन्हा बोलूं लागली—

"हें पहा, तूं मला फार आवडतोस, तुझा खेळ मी तूं दिसावा म्हणून केवळ पहात असतें. रविवारीं शाळा बंद असली कीं मला बरें वाटत नाही."—

मला आठवतें, मलाहि हेंच म्हणायचें होतें.

" माझे बाबा म्हणतात, 'सलमाचें लग्न लवकरच करावयाचें.' माझ्यालायक या गांवात मुलगा नाही. मला सुंदर, शिकलेला. श्रीमंत नवरा पाहून देणार आहेत ते. माझें लग्न होईल लवकर. मुलींचें काय, लग्न झालें की संपलेंच सर्व. मग मला माझा नवरा शाळेबद्दल विचारील. मी त्याला तुझ्याबद्दल सांगेन. तूं असा आहेस, तसा आहेस, छान खेळतोस, खूप आनंदांत रहातोस-पण माझ्यावर मात्र एक गोष्ट सांगावयाची पाळी आणूं नकोस. ती ही की तूं अभद्र बोलतोस. तुझें मन मळलें आहे. मी खोटें बोललेलें तुला आवडायचें नाही ना? सर्वांचें तूं ऐकतोस, राज्येंच्या राज्यें कमावून लोकांना देतोस; मीहि तुझा खेळ रोज पाहतें. मला येवढें तर दे. देशील ना? "

मी काय बोलणार? ओली माती कुंभाराच्या चाकावर आकारित होतांना तिला काय वाटत असेल? दगडांतून मूर्ति कोरली जात असतांना दगडांना काय वाटत असेल? विलक्षण वेदना! पण विलक्षण संतोष!

" तूं आमच्या दुकानावर येतोस. माझ्या घरीं कां येत नाहीस ? आज येशील ? "

" नाही. "

" कां रे, तुला माहित नाहीं घर ? माझ्याबरोबर चल—"

" छे, तूं मुसलमान. तूं कोंबडी खातेस. बकरें खातेस. "

" कुणी सांगितलें तुला ? माझे बाबा तर ह्या वस्तु घरांत येऊं देत नाहीत. तेवढीच अडचण असली तर मग ती दूर झाली.—"

" पण तरीहि मी येणार नाही. "

" बरं, ठीक, जा. एका सुंदर मुलाची त्याचे मित्र वाट पहात आहेत. " असें म्हणून ती प्रसन्न मनमोकळें हसली आणि वर्गा-कडे वळली. मी परतलों. माझें राज्य कुणी घेतलें याचीहि मीं चौकशी केली नाही आणि शाळेंत पण मला बसावेसं वाटलें नाही.

आणि त्यानंतर माझ्या गोट्या हुकल्या तरी मीं इतरांचे डाव निमूटपणे आणि आनंदाने दिले. त्यांत त्यांनाहि मौज वाटली आणि आमचा खेळ खूपच रंगूं लागला.

सायंकाळीं एकदा शाळेंत हुतूतू खेळत होतों. लिंबाची सावली गर्द होती. पाण्याने पाटी ओढली व खेळ सुरू झाला. तें मैदान थोडें दूर होतें. सलमा तिथून बरीच दूर दिसत होती.

खेळ रंगांत आला. मला एका मुलाने पकडलें. तो दंश मीं मनांत धरला आणि संधी येतांच त्याला पकडून खूप खूप गुद्दे दिले, पाठींत रगडे दिले. इतरांनी भांडण सोडविलें व पुनः खेळ सुरू झाला.

लागलीच दुसरे दिवशीं सलमाने एकटें पाहून मला बोलाविलें.

" तूं खेळत होतास काल की मारामारी करीत होतास ? "

" पण तूं मला एकट्यालाच कां म्हणतेस ? मला दुसऱ्याने अगोदर पकडून मारलें तें तुला दिसलें नाहीं. मीं मारलें तेवढें—"

" त्याच्या जवळून तेवढेंच शिकायला तूं खेळतोस कां ? तूं त्यांना शिकवायचें तर तूंच त्यांच्याजवळून शिकतोस ? आणि ही मारामारी ! हा राग ? साधी बकरी सुद्धा आपल्यापेक्षा शहाणी असते. ती बाभळीची फांदी तोंडांत धरून पालवी तेवढी अलगद खाते व काटे सोडते. एकहि काटा बोचत नाही तिला, आणि आपण बकऱ्या पोसणारीं माणसें पालवी सोडून काटेच कां खाणार ? छे ! असें नाही. उद्यापासून तुझा हा खेळ पहायला मला येऊन त्या झाडाशींच टेकून उभें रहावें लागेल. "

कुणी अरे म्हटल्यास कारे म्हणून मला चटकन् प्रतिकार करतां येत असे, पण सलिमाचा प्रतिकार करावयाचा तो कसा ? तिच्या सामर्थ्यापुढे माझा मुळी टिकावच लागेना. अमर्पाने प्रतिकार करून नंतर खेद करण्याची जी अनेकदा पाळी येते तसली पाळी मात्र ती असेतोवर तिने माझ्यावर कधी येऊं दिली नाहीं. त्यानंतर माझ्या तेथील सबंध शालेय जीवनांत गावाला किंवा झाडाला टेकून उभी असलेली तिची ती कल्याणमय शुभमूर्तीच मीं सतत पाहिली ! फुलें टाकून माती सुगंधित करणारी तिची दृष्टि, कोमेजलेल्या पुष्पवल्लरीवर पावसाची सर ओतणारं तिचं धवल हास्य, विधात्याने दिलेलें सुंदर मन आणि रेखीव शरीर त्याच्या

चरणीं जसेचें तसेंच काय पण आणखी विकसित, विलोभनीय करून अर्पण करण्याचा निश्चय दाखवीत असलेले तिचे ओट-तिची जिवणी !

पुढे माझ्यावर खेडयांतले संस्कार फार होऊं नयेत म्हणून वडिलांनी मला तेथून काढून शहराच्या शाळेंत मामाकडे पाठविलें.

या नव्या शाळेंतील पडवीचे खांब राक्षसासारखे निर्लज्ज, विरूप वाटत. झाडांचे बुंधेहि भुतासारखे अशुभ दिसत.

आणि जवळून उडवून दिलेल्या पाखरांचा क्षितिजाकडे जातांना प्रतिक्षणीं कमी कमी होत जाणारा तो आवाज–तो मधुबोल !

पुणे, २-५-४५

## ३ तिच्या आईचें अक्षर

सरकारच्या खात्यांत काम करणारा हा एक गरीब कारकून. चार कच्चीं बच्चीं त्याच्या पदरीं आहेत. गेलीं वीस वर्षे इमानेइतबारें तो आपली दोन रुपये रोजीची नोकरी बजावीत आहे. फारशी खुशी कधी त्याला वाटली नाही आणि तीव्र दुःखाचा किंवा अनुतापाचा त्याला उमाळा आलेलाहि कधी कुणी पाहिला नाही.

तो परवां माझ्याकडे येऊन मला हे कागद देऊन गेला.

यापूर्वी मला तो अनेकदां भेटला होता. तीन वर्षांपूर्वी कस्तूरबांनाहि सरकारने पकडून नेलें त्या दिवशीं सायंकाळीं तो आला तेव्हा त्याचें मन बरेंच अस्वस्थ झालें होतें. त्या वेळीं तो मला म्हणाला होता, "काय हो, नक्की हें सरकार जाणार कां ? तसें सांगा म्हणजे त्याची भीति नको. मलाहि परवांपासून वाटतें आहे, मारावी लाथ नोकरीवर !"

मुलाबाळांच्या उपासमारीपेक्षाहि सरकारची भीतीच त्याच्या उरावर जास्त बसली होती. आणि म्हणून त्याचें मन कितीहि

देशाच्या बाजूने असलें तरी शरीराचें यंत्र सरकारचीं कामें सुरळित करीत होतें.

त्यानंतर मीच बेपत्ता झालों. पुढे सापडून पकडला गेलों. सुट-ल्यावर, स्थिरस्थावर झाल्यावर मग त्या रात्रीं तो आला. मला कड-कडून भेटला. यात्रेवरून आलेल्याचे चरणरज जसें भाविक आपल्या माथीं घेतात तसें त्याचें त्या दिवशींचें वागणें. ते कागद देतांना त्याने विलक्षण हकीगत सांगितली :

"तुम्ही गेलां व त्या खोलींत मग एक मुलगी रहायला आली. फार सुंदर होती दिसायला. व्यवस्थितपणें रहात असे. मुखा-वर गांभीर्य सदाचें असे तिच्या. फारसें वय नव्हतें. असेल सोळा सतरा वर्षांचें. काय करीत असे हें मला अजूनहि कळलें नाही. खोलीचा जिना चढायची तो मात्र पुस्तकें घेऊन. कुठे शाळाकॉलेजांत जात असेल. आमच्या छोटया सोनीची तिच्याशीं चांगली गट्टी जमली होती. सोनीच्या निमित्तानें सोनीची आईहि तिच्याशीं एकाददुसरा शब्द बोले. तरुण, सुंदर, अबोल, सुजन अशा व्यक्ती-बद्दल सहजच आकर्षण वाटतें. आमच्या तिला व मलाहि तिच्या-बद्दल वाटे. ती वेळींअवेळीं स्वतःच्या खोलीवर येई. तांब्याभर पाणी, कपभर दूध, असें कधी कधी तिला लागे. आणि जसें निःसंकोचपणें आईवडिलांजवळ आपण मागतों तशी ती येई व हवें तें घेऊन जाई. पण सगळें तितपतच. तिच्याबद्दल आम्ही फारसें विचारावें अशी कधी संधीच दिली नाही तिने. आम्ही तिचीं कामें करीत असूं याचें कारण आम्हांला तिच्याबद्दल खूप आपलेपणा,

आकर्षण, दरारा वाटे, येवढेंच !

"एक दिवस ती सायंकाळीं माझ्याकडे आली. मुलें बाहेर गेलीं होतीं. जरा सावधगिरीने तिने आजुबाजूला पाहिलें आणि म्हणाली, 'अडीअडचणीच्या वेळेला तुमच्या इथलीं माणसें माझ्या गरजेला उपयोगी पडलीं. तुम्हां मंडळीकडे मी आईवडिलांच्या नजरेनेच पाहतें. दिवस वाईट आहेत. कधी माझ्यावर पकडलें जाण्याचा प्रसंग येईल सांगतां येत नाही. हें पाकिट मी तुमच्याजवळ देतें. त्यांत गुप्त असें कांही नाही. माझ्या आईचें अक्षर आहे त्यांत. माझ्याजवळ असलें आणि पोलिसांना सांपडलें तर त्यांतून ते हवे तेवढे अर्थ काढूं शकतात. तुमच्याकडे असलें तर त्याला किंमत नाही. मी परत आलें तर मला द्या किंवा मग तुम्हांला वाटेल त्या जबाबदार माणसाजवळ देऊन तुम्ही मोकळे व्हा.'

"येवढें म्हणून ती गेली आणि त्याच रात्रीं पोलिसांनी तिच्या घराची झडती घेऊन तिला पकडलें. तिच्या खोलीला कुलुप घातलें. त्यानंतर गेलीं तीन वर्षें तिच्याबद्दल कांहीच ऐकूं आलें नाही. कुठल्या तरुंगांत आहे की किल्ल्यांत देव जाणें ! आम्हांलाहि चौकशी करणें शक्य नाही. विजया हें तिचें नांवच तेवढें आम्हांला ठाऊक. शिवाय आमच्या मागे हीं कच्चींबच्चीं. मनांत कितीहि वाटलें, आणि वाटतेंच हो, तरी भिऊन रहावें लागतें. अहो, हें पाकीट घेतांनाच तर मन ठोके देत होतें. तुम्ही आता सुटून आल्यावर तुमच्यापेक्षा जास्त जबाबदार असा कोण सापडेल की ज्याच्याजवळ हें पाकिट मीं द्यावें ? तुम्हांला कदाचित् तिचा पत्ताहि लागेल. पहा,

जपून असूं द्या. आली बिचारी परत तर आईच्या अक्षरासाठी तळमळेल. मला वाटतें, तिची आई जग सोडून गेली असावी. वडील नव्हते हें तर तिच्याच तोंडून ऐकलें होतें. फार चांगली मुलगी बरें का! दिसायची अगदी हरणासारखी पण मन वाघासारखें निघालें तिचें. काय आमची पात्रता तिच्याबद्दल बोलायची! आम्हीं असेच—उकिरडयावरील छय्यांसारखे!"

तो उठून गेला. मीं तें पाकिट उघडलें! तिच्या आईचें अक्षर!

कशी अद्‌भुत हकीकत आहे! मला तुरुंगांत असतां असें वाटे, की ही जी मोठी आग भडकली ती एकदमच! पण अशा ठिणग्या जागोजागीं चमकत होत्या. आणि तो कारकून!—त्याचीहि राख चांगलीच गरम झाली होती.

विजयाताई! जिथे कुठे तूं असशील त्या ठिकाणीं वृत्तपत्रें मिळाल्यास त्यावरून सध्यापुरतें येवढेंच तुला जाणतां येण्याची व्यवस्था करीत आहें की तुझ्या आईचें 'अक्षर' आम्ही आमच्या हृदयाच्या पेटींत जपून ठेवलें आहे. तें सध्या तुझ्याकडे पाठविणें शक्य नाही, तरी नुसतें वाचूनच तुला दिलासा मिळूं शकेल अशी आशा आहे. हा आवाज कुठेहि ऐकूं जाईल तुला! तो कारकून होता तरी तुझें पाकिट त्याने भिऊन नाहीसें केलें नाही हें तुला कळावें आणि तत्सम जातीबद्दल तूं जर मनांत अढी धरली असेल तर तीहि काढून टाकावीस!

त्या पाकिटांतील कागदांत आरंभीं पुरुषी थाटाचें अक्षर होतें.

विजयेच्या आईला मावशी म्हणणाऱ्या कुणाचें तरी तें असावें. त्याने लिहून ठेवलें आहे :

" चौदा वर्षांपूर्वी मावशी जेव्हा आमच्याकडे रहात होती तेव्हा ती किती चांगली दिसायची! किती आशा लावल्या होत्या सर्वांनी तिच्यावर! खेळांत, अभ्यासांत, साहित्यिक चळवळींत, कॉलेजचीं सर्व वर्षे पहिली असलेली शशिकला सर्वांचीच आवडती होती. तेव्हाची टांग्यांतून घरीं येणारी शशी आणि आता एकदम एका खेडेगावांत गडप झालेली मावशी यांच्यांत जमीनअस्मानाचें अंतर पडलें होतें. स्वतःचें कुंकू ठसठशीत दिसावें म्हणून काळजी घेणाऱ्या शशीला तें चारेक वर्षानंतर कायमचें पुसून टाकावें लागलें होतें. वसंतऋतूंत बहरलेलें तिचें संसाराचें उद्यान परिस्थितीच्या झंझावाताने उध्वस्त झालें होतें. आरंभींचें तिचें आयुष्य म्हणजे मोगरीचीं फुललेलीं फुलें! आणि नंतर ती म्हणते, 'हीं आता निर्माल्य राहिलीं आहेत!'

" आज गुरुवार! सात वर्षें झालीं बरोबर तिची भेट झाल्याला. आता कधी भेट होईल कुणास ठाऊक! ही लढाई संपेपर्यंत आपला देश दिसणें शक्य नाही. आणि त्यानंतर देखील कुणाचा जय होतो यावर आमचें भवितव्य अवलंबून!

" मागे एकदा आली होती तिच्या कॉलेजच्या समारंभाला. तीच तिची शेवटची भेट! विजया त्या वेळीं पांच वर्षांची होती. त्या दोघींचें तेंच शेवटचें चित्र माझ्या मनावर ठसलें आहे. "

# तिच्या आईचें अक्षर

" समारंभाचें यश आपल्या पदरांत घेऊन शशी घरीं आली त्या वेळीं पूर्वस्मृतींनी म्हणा, किंवा मानवसुलभ भावनांनी, पण तिचें मुख आनंदाने कसें बहरून आलें होतें. चार वर्षे हसली नव्हती ती जणुं त्या वेळीं हसली. ती आणि तिची विजू! विजूचेंहि चित्र किती मनोहर दिसतें आज! तिच्या अस्मानी रंगाच्या झग्यावर माव-शीच्या गळयांतला मोठा पांढरा हार! आकाशगंगेचा प्रवाह जणुं! मावशीला मिळालेला विडाहि तिनेच बोकणल्यामुळे ओठावर फुटून निघून सफरचंदाला लाली चढली होती.

" आपल्या माणसांचीं हीं चित्रें या रणगाडयांच्या पार्श्व-भूमीवर कशीं उठून दिसतात! पूर्वी तीं कधीच इतकीं लोभनीय दिसत नसत. इथे आपलें म्हणायचें म्हणजे ही बंदूक आहे. तिला आता संगिनी म्हणायचें!

" विजूसाठी लिहून ठेवलेले कागद ज्या रात्रीं तिने माझ्या स्वाधीन केले ती रात्र! छटान् छटा आठवतात मला तिच्या! माव-शीच्या खेडयांतील टुमदार घराच्या मागील अंगणांतील बागेच्या विहिरीवर आम्ही बसलों होतों. आकाशांत चंद्राचें स्वच्छंद भ्रमण सुरू होतें. कांही तुरळक ढग वाऱ्याने इतस्ततः विखुरले होते. इत-क्यांत एका ढगाचें अणीदार टोक चंद्रबिंबाच्या मधोमध घुसलें. पोलादी चाकूने पदार्थाचीं दोन शकलें करावींत व तो चर्रकन आंत घुसलेला चाकू तसाच रहावा त्याप्रमाणे तो ढग बराच वेळ तशा स्थितींत होता.

" मन निववविण्याचा प्रयत्न करीत असतांना तें दृश्य असह्य होऊनच जणुं तिने संथपणें आपली जीवनकथा सांगून टाकली !

" **आज** कितीतरी दिवसांनी मी माझ्या गतस्मृतींना उजळा देत आहें. ते सगळे दिवस केवळ स्वप्नासारखे, थरारून सोडणाऱ्या अनुभवांनी भरलेले.

" कॉलेजच्या माझ्या जीवनांत माझ्या बुद्धिमत्तेचें कौतुक होतें. मलाहि जाणीव होती त्याची. इंटरच्या परीक्षेंत माझा नंबर सर्वांत वर यावा अशी सगळ्यांची माझ्याकडून अपेक्षा होती. नुसता अभ्यास करून मला तें सहज साध्य करतां आलें असतें. पण त्यांत स्वारस्य काय ? कॉलेज सुटलें की सर्व गोष्टीच मग सुटायच्या. खेळ, वादविवाद यांतहि मन घालायला मला आवडे अगदी मनापासून !

" त्याच वर्षी मुलींनी नाटक करून दाखवावयाचें ठरविलें. त्यांत मुख्य काम करणें आणि इतर कामें बसविणें माझ्याच वाट्याला आलें. तब्बल दोन महिने त्यांत घालवून बसलें मी. शेवटीं कसून अभ्यास करावयाचें ठरवून रात्रीचा दिवस करायला सुरुवात केली.

" त्याच वेळीं आमच्या भाऊंच्या बंगल्याजवळून अर्ध्या फर्लांगावर समोर गच्ची असलेल्या एका खोलींत रहात असलेल्या हेमंत देशपांडे नांवाच्या एम्. ए. च्या विद्यार्थ्यांशीं माझी ओळख झाली. आमच्या कॉलेजच्या वादविवाद सभेंत त्यांचीं दोनचार भाषणें मीं ऐकलीं होतीं. त्यांच्या इंग्रजीच्या व्यासंगाबद्दल व भाषेबद्दल भाऊंचे मित्र प्रो. पाध्ये आमच्याकडे आले म्हणजे खूप चांगले बोलत. ते म्हणत, 'इतकें चांगलें समालोचक ज्ञान मीं फार थोडयांत पाहिलें.'

" त्यांची इंग्रजींत मदत घेऊन आपणहि इंग्रजींत नंबर मारावा असें वाटून मीं त्यांची ओळख करून घेतली. आणि वाढविली पण ! ते म्हणत, मीच त्यांच्यापेक्षां काव्यपरीक्षण चांगलें करतें. मी मात्र थोडयाच परिचयांत त्यांच्या बुद्धितेजाने दिपून गेलें होतें.

" पुढचा इतिहास सर्वांनी उघडया डोळ्यांनी पाहिला आहे. आम्ही उभयतांनी लग्न करण्याचा निश्चय केला. भाऊंना ती कल्पना पसंत पडली. त्यांनी माझ्या आईला सांगितली. आई म्हणजे काय बाईमाणूस ! तिने उलट माझेंच मत घेतलें. भाऊंनी पुढाकार घेतला. त्यांनी व ताईनेच देवक धरलें. आणि मोठया थाटांत आमचें दोघांचें लग्न झालें. माझें नांव बदलून घेतांनाच ते मला म्हणाले होते, ' तुझें जीवन बदललें याची तुला नक्की कधी तरी जाणीव होईल ! '

" त्यांना परीक्षेंत पहिला वर्ग मिळाला ! मलाहि पण ! इतकें शुभ लागलें हें लग्न आम्हांला. किती किती कौतुक झालें आमचें. गंगेसारखें निर्मल आणि पोषक असें आमचें जीवन चालू झालें. ना कसली उणीव, ना मनोमालिन्य. उदासवाणें रहाण्याचा कधी प्रसंग आला नाही. परस्परसहकार मनापासून होत असल्याने जें काव्यशास्त्रविनोदाचें जीवन कॉलेजांत जगलों तेंच पुढे अप्रतिहत सुरू झालें. जास्त विश्वस्तपणें, जास्त विश्रब्ध असें.

" त्यांच्या इस्टेटीच्या गावींच आम्ही राहिलों. तिथली टुमदार बंगली सुबक, शोभिवंत करण्याचा माझ्याने होईल तेवढा मी रात्रंदिन प्रयत्न करीत असें. त्यांचा शरीरश्रमावर विश्वास. ते स्वतः

खादी वापरीत. आपले कपडे स्वतः धूत. शेतावर जाऊन नांगर वखर धरीत. मोटेने पाणी देत. मलाहि घरच्या बागेला पाणी द्यावें लागे. त्यामुळे माझी आणि त्या फुलझाडांची प्रकृतीहि चांगली असे.

" आयुष्यांत हंसतमुखाने ज्या ज्या वेळीं जितकें सुख मिळविणें शक्य आहे तेवढें भोगून घ्यावें असें त्यांचें सदाचें सांगणें. 'एक क्षणहि सत्य आणि त्या अवधींतील आनंदहि सत्य ! तो क्षण औदासिन्यांत गेला की मग मात्र पदरीं असत्याचा दोष येतो,' असें ते म्हणत. 'सुखच फक्त आपल्या हातीं असतें. दुःखें, त्याग कधी येतील आणि कधी आपला वाटा घेऊन जातील याचा आपल्याला अंदाज बांधतां येत नाही. म्हणून त्यासाठी सदा तत्पर असलें पाहिजे. पस्तावा नको. साधुसंत सांगत, मृत्यूसाठी तयार रहा; याचा अर्थ जीवनाचा उपयोग काटेकोर करा असा घ्यावयाचा.'

" त्या वेळीं त्यांच्या या सांगण्यांत कांही गूढार्थ असेल असें मला मुळीहि वाटलें नाही. कदाचित् त्या वेळीं कांही नसेल देखील त्यांच्या मनांत.

" पुढे माझ्याने झाडांना पाणी देणें होईना. ते म्हणाले, 'आता मी होतों माळी आणि तूं हो माझी मालन. मी पाणी घळवीन, तुला सुन्दर फुलें देईन. ' त्याच दिवसांत रोज सायंकाळीं आंगणांत बसून आम्ही रविबाबूंचें 'मालंच' हें पुस्तक वाचून काढलें. त्यांतली माळिण मला आवडेना. हेमंत म्हणत, 'तुला आवडली नाही ना ? मग गुरुदेव सफल झाले. त्यांचाहि तोच अंदाज होता. गुरुदेवांना माझ्या मालनवर पुस्तक लिहायला सांगेन !' "

माझ्यावर पुस्तक ! त्यांत माझ्या माळयाचें वर्णन ! मला कांहीतरी लिहिण्यासारखें चरित्र करून दाखवायला हवें नाही !

" असे ते दिवस आनंदाचे व सुखाचे गेले. सीतेचें 'त्वया सह निवत्स्यामि वनेषु मधुगंधिषु " हें स्वप्न स्वप्नच राहिलें. माझें मात्र खरें झालें !

" आणि अशा अनेक 'कुसुमयुतसुगंधी' गोष्टींनी मनाचे रांजण काठोकाठ भरले असतांना एका रात्रीं विजूचा जन्म झाला. त्यांनी आपल्या आवडीचें विजया नांव ठेविलें आणि मलाहि तें आवडलें.

" त्याच दिवसांत एकदा हेमंत महिनाभर बाहेर गेले. त्यांचे जुने स्नेही सोबती जबलपूरला एकत्र होणार होते आणि त्यांचें एक छोटेंसें संमेलन मदनमहालाच्या प्रांगणांत भरावयाचें होतें. विजू पुरती एक महिन्याचीहि नसल्याने मला बरोबर नेण्याचा प्रश्न नव्हता व मला त्यांत कांही वाटलेंहि नाही.

" परत आले ते एक सुंदर संगमरवरी ताजमहाल व एक पुतळा घेऊन. तीन चार वर्षांत आम्ही वेगळे असे कधीच राहिलों नव्हतों. त्यामुळे त्यांना व मलाहि तो वियोगाचा महिना फार जाणवला. आणि आल्यानंतर क्षण क्षण मोलाचा करून आम्ही इतक्या सुखांत व सहजीवनांत घालविला की त्यावरून स्वर्गसुखें ओवाळून टाकावींत.

" पण पुढे असें झालें. माझ्या ध्यानीं हळुहळु एक गोष्ट येउं लागली. ते कधी कधी आताशा एकटे बसत. चेहरा विचारमग्न

असा असे. येतांना त्यांनी पन्नाससाठ पुस्तकें आणलीं होतीं. अर्थ-शास्त्र आणि राजकारणाचीं सर्व होतीं तीं रुक्ष अशीं. माझ्या प्रकृतीच्या नाजुकपणामुळे ते एकटेच वाचत बसत. परीक्षेच्या वेळेसारख्या रात्री रात्री जागून काढीत. त्यांच्या वृत्तींतील अल्लडपणा पार लोपून जाई. कधी रात्रीचे थकल्यासारखें वाटून मला किंवा विजूला हांक मारून जागें करीत.

" मित्रांकडे म्हणून आतांशा त्यांचें जास्त जाणें घडूं लागलें होतें. चार दोन दिवसांनी स्वारी परत आल्यावर इतकी आनंदांत असायची की कसलें काम होतें, कशाला गेलां होतां असले प्रश्न विचारायची गरजच पडत नसे आणि सुचतहि नसे विचारायला !

" पण तो आनंद नुसता वरपांगीं होता. गवताच्या गंजींत अग्नि धुमसत होता. बाहेरून आनंदी दिसणाऱ्या अंतःकरणांत स्फुलिंग उठत होते. कल्पनारम्य ध्येयांचीं सुमधुर स्वप्नें होतीं आणि त्याच गर्दींत मीं व विजूने थारा घेतला होता.

" बरेच दिवस मला कसलीच कल्पना नव्हती. वादळ होण्या-पूर्वी सर्वत्र शांतता असते तसेंच चाललें होतें सारें ! कांही दिवसांनी मला सर्व गोष्टींचा खुलासा हळुहळु करून द्यायचा झाला. असे जिवंत निखारे, इतकी जहाल, ज्वलंत, भयंकर मतें, आजवर कुठे दडलीं होतीं हेंच कळेना मला ! माझ्या जीवाचा थरकांप होई. तेव्हा ते माझ्याजवळ येत व म्हणत, ' वेडे, उगीच शिकलीस तूं. अग, तुला त्यांत यत्किंचित्‌हि त्रास होणार नाही आणि मलहि होईलच असें नाही. तूं माझें सर्वस्व ! तुझी भूमिका स्फूर्तिदेवतेची.

आमच्या मित्रमंडळीचें फार दिवसांपासून शपथविधीने असें ठरलें होतें की प्रत्येकाने लौकिकार्थाने जीवनांत श्रेष्ठपद मिळवावयाचें आणि एक अपत्य होईपर्यंत संसार करायचा. त्यानंतर इष्टकर्तव्यें अंगीकृत करावयाचीं. आपल्या देशाच्या हीनदीन स्थितीची आठवण ठेऊन ह्या वानप्रस्थाश्रमाची कालमर्यादा इतकी लवकर पाळावयाचें ठरलें आहे ! आपलें कर्तव्य जास्त मोठें आहे. सुखाचा वाटा संपून आता दुसरे वाटेकरी आले आहेत. '

"मला पुष्कळदां वाटे, मी सुशिक्षित नसतें तर फार बरें झालें असतें. पण त्यांच्याकडे पाहून मन विचार करी, आपलें कांहीच कर्तव्य नाही का ? नुसत्या सुखाला सहजीवन थोडेंच म्हणायचें ! पुनः ते तर आपल्याला स्फूर्तिदेवता मानतात.

" नंतर दोन वर्षांनी काय घडलें हें सर्वांना ठाऊक आहेच. हंपीयार्ड बॉंब केसचा फटका फुटला. सर्व मध्यप्रांत हादरला. दिसेल त्याला पकडून सरकार तुरुंगांत टाकूं लागलें.

" त्याच दिवशीं रात्रीं मला जागी करून सांगायचें झालें, 'शशी, उद्या मी जाणार निघून. निरपराधी लोकांची धरपकड सुरू झालेली आहे. आपल्या लोकांना छळ सोसायची किंवा मानवी मूल्यें ओळखावयाची सवय झालेली नाही. सबब मी फार दिवस मोकळा रहाणार नाही. इतके लवकर तुरुंगांत जाऊन सडत राहण्याची माझी बिलकुल इच्छा नाही. अजून पुष्कळ कामें आहेत. मी एकदा इथून गेलों की कुणाच्या देवालाहि सापडणार नाही. तुला भेटायला येईन सवडीने, परिस्थिति जशी असेल तसें तारतम्य संभाळून ! तरी

आता तुझ्या शिक्षणाची व संस्काराची कसोटी आहे. लोकांना आता यापुढे तुझी किंमत कळवून घेण्याची वेळ आली आहे. तुला पैशा-अडक्याची ददात पडणार नाही. तुला लागतील तेवढे रुपये दोन बोटांच्या चिठ्ठीवर मिळण्याची व्यवस्था मी करून जाईनच. कुणी विचारायला आल्यास खुशाल सांग, घरीं नाहीत, माहित नाही. झडती घेतली तर घेऊं दे. कांही मिळायचें नाही कुणाला. उलट त्या निमित्ताने घर स्वच्छ होईल!'

"पुनः ते त्याच रात्रीं म्हणाले, 'शशी! विजूचें जीवन तुझ्या हातीं आहे. तिला पडद्यांतली रोशनबिबी बनवूं नकोस. तिच्या सौंदर्याचा तुला मोह पडेल; पण नुसत्या सुखाने व सुरक्षित जीवनानेच सौंदर्याचें सार्थक होतें असें नाही.'

"एवढें सांगून मग इतर गोष्टी सुरू केल्या. मला अजूनहि नवल वाटतें, की मी त्या वेळीं रडलें कसें नाही! काय जादू केली होती त्यांनी नकळे!

"दुसरा दिवस माझ्या तपस्येचा. गंगावतरण सहन करणाऱ्या शंकराची मूर्ति मीं सकाळीं पूजिली. त्यांनी आणलेला ताजमहाल मधल्या हॉलमध्ये आणून ठेवला व त्यांना निरोप दिला. लोक म्हणत, मी फार नाजुक आहें, सुकुमार आहें. पण हेच माझे सुकुमार हात त्यांना निरोप देतांना कल्याणार्थी वर उठले. विजूनेहि टाळ्या वाजविल्या. मानवी अंतःकरणांत इतक्या अजस्र शक्तीची धारा कुठे साठविली असते कळत नाही!

"अंधार कापीत अदृश्य होणारी त्यांची मूर्ति पुनः माझ्या

दृष्टीला पडली नाही! माझ्या गतस्मृति व विजूचे डोळे–यांची मात्र सारखी सोबत रात्रंदिवस!

" नंतर त्यांच्या मित्रांची तातडीची बैठक पुढल्याच वर्षी भरली. त्यांची मी पत्नी म्हणून मलाहि आमंत्रण आलें.

" आता लढाई सुरू होऊन एक वर्ष झालें आहे. प्रभा सिंगापुरला गेला आहे. हा सिगरेट पिण्याचें सोंग करून तिथें हि आग पेटविणार!

" या वर्षाची बैठक अगदी सोक्षमोक्षाची. मी तिथे हजर राहणार! भाग घेणार! विजू आता चवदा वर्षांची आहे. आपल्या मानाने ती सर्वच बाबतींत आता मोठी झाली आहे. ती ताईजवळ राहील. ताईच माझी आई झाली माझ्या बालपणीं, आता विजूचीहि तीच होईल. ताईला प्रभाचीं पत्रें येतात. गरज लागली तेव्हा हेंहि ती विजूला देऊं शकेल. माझ्या लाडक्या विजू! तुला भेटायला येईन बाळ मीहि सवडीने व परिस्थितीचें तारतम्य पाहून! तोवर तुझ्या आईचा हा कल्याणार्थी आशीर्वाद!"

—त्या पाकिटांत एवढाच मजकूर होता. यापेक्षा जास्त आणखी काय असायला हवें होतें?

—विजुताई! तुझ्या आईच्या येण्याची व आशीर्वादाची आम्हीहि वाट पहात आहोत!

वर्धा, १५-१०-४५

# ४ परिवर्तन

आज सण नव्हता तरीहि लोकांनी नवे कपडे घातले होते. दिवाळीला बराच अवधि होता व लोकांनी घरें स्वच्छ केलीं होतीं. पांढऱ्या मातीने भिंती सारवून त्यावर गेरूने चित्रें काढलीं होतीं. स्त्रियांनी आंगणांतील तुळशीचीं वृंदावनें लिंपून पोतून स्वच्छ केलीं होतीं. तुळशीचें आळें पाण्याने भरून दिलें होतें. गावच्या लोकसभेने विहिरी स्वच्छ केल्या होत्या. आजूबाजूचे खड्डखुड्ड भरून बुजवून टाकण्यांत आले होते. गुरेढोरें नदीवरून आंघोळ घालून आणलीं होतीं. रस्त्यावरची घाण दिसेनाशी झाली होती.

आकाशांत ढग नव्हते, पण लोकांच्या मनाचे मोर नाचूं लागले होते. वैशाखाचा संताप निववीत मृगच्छाया पसरावी आणि पक्षांनीहि चिंवचिंवाट करूं लागावें. हस्त नक्षत्र संपून सांजसकाळ गारवा यावा आणि दिवाळी जवळ आल्याचें गाईवासरांनाहि ओळखतां यावें.

कोणतेंहि संभाव्य कारण नसतांना अवचित एकाएकीं त्या खेड्याचें मन आणि शरीर दोन्ही उत्साहपूर्ण, प्रसन्न, उल्हासमय दिसूं लागलीं होतीं. जणु यशोदा घरीचा नंदलाल बाल गोपालांशी खेळायला

येणार होता. जणु देवकीचा चोरटा मुलगा बाजाराला निघालेल्या गवळणींची वाटमारी करूं येत होता. काय होतें कुणास ठाऊक! मुलें हसत बागडत होतीं, माणसें ख्यालीखुशालींत होतीं, बायका गात नाचत होत्या आणि गुरेंवासरें देखील त्यांच्या आनंदाला साथ द्यायला शेपट्या उंच करून कानीं वारा गेल्यागत मस्तवालपणा करीत होतीं.

" सतां धाता, निगमगुणगीतः " असें ज्याचें वर्णन केलें जातें तो शरण्य श्रीकृष्ण यायची वेळ झाली होती किंवा नाही न कळे, पण गावकऱ्यांना या चार पांच दिवसांत अशी एक बातमी कळली होती की ज्याने त्यांना आपलें मानलें, ज्याने त्यांच्यासाठीं सर्वस्व त्यागिलें, स्नेह, दया, सुख हें तृणवत् मानलें आणि उलटपक्षी त्यांनीहि ज्याच्यासाठी पराकाष्ठेचा त्याग केला तो त्यांचा भरत या चार दिवसांत कधी तरी येणार होता. तें गाव त्याने आपलें म्हणून मानलें होतें. यच्चावत् स्त्रियांना माता मानूनहि आपली म्हणून आई असते. भुवनत्रय 'स्वदेश मानूनहि आपलें म्हणून एक गाव असतें. तशी ही भरताची धनवाडी, जिच्यासाठी त्याने आईपेक्षाहि जास्त खस्ता खाल्ल्या होत्या.

असा हा भरत येणार, आपलीं सर्व कामें बाजूला सारून इथे चार दिवस रहाणार, आपलें सर्व मोठेंपण विसरून सर्वांत मिसळणार! आता ' दिसतील तुज हरिचरण उमटले यमुनेच्या काठाकाठानें!' आता आखाडयाची माती तेल, लिंबू, देऊन कसून ठेवायला हवी. आता नांगराच्या पासा परजून ठेवायला हव्यात. आता दळणकांडण भिजवून वाळवून ठेवायला हवें.

त्याची ती सजल, शामल, सुदृढ, विनयमूर्ति! गावची चिडी-मुंगीहि तिचें स्वागत इच्छित होती. तो बोलेल तें झेलायचें, तो सांगेल तें करायचें, वागेल तें उचलायचें, म्हणेल तें ऐकायचें! आमचें बरें व्हावें म्हणून तो झगडला. राक्षसांचें बळ असणाऱ्यांनी त्याला चिणला, चेंदला. त्याच्या सगळया जखमा आम्ही चोळून देऊं! आम्हांला पोट-भर मिळावें म्हणून तो शिणला. राक्षसाचा आहार असणाऱ्यांनी त्याला भाकर-पाण्यासाठी हैराण केलें. त्याची भूक इथे निववूं. तो शिणलेला येईल तर त्याला विसावा देऊं. जागलेला येईल तर त्याच्या झोपेसाठी गाणीं म्हणूं. भुकेला येईल तर आमच्या घरीं जेववूं. आणि जखमांनी जर्जर होउन आला तर आमच्या रक्तांत औषध खलून त्यावर मलमपट्टी करूं!

त्याला एकदाचा येऊं दे! त्याला एकदाचा पाहूं दे!

गावकऱ्यांच्या ह्या सर्व इच्छा साकार झाल्या. आणि एक दिवस ती सगुण मूर्ति गावची वेस ओलांडून आंत आली. पायीं काय आहे? साध्या वहाणा! हातीं काय आहे? बांबूची उंच काठी! खांद्यावर काय? काळी घोंगडी! शरीर सुकलेलें, चेहरा फुललेला!

आणि त्या कृश देहांतहि ग्रामवासियांना शिवाचा आणि सौंदर्याचा साक्षात्कार झाला.

पारांना पाणी घातलें म्हणूनहि असेल कदाचित् पण आंब्यालिंबा-चीं झाडें हिरवा बहर हालवूं लागलीं. मंद मंद वारे. शकुंतांचा मधुरतर स्वर! अशा थाटांत तो आला, गांवकऱ्यांनी पाहिला. कासव जसें पिलां-कडे पाहतें. शरदाच्या चंद्रगोलांतून चकोर अमृत कण वेचून घेतात!

त्याने कुणाला हार घालूं दिला नाही. कुणाला पायां लागूं दिलें नाही. सर्वांसमवेत तो नदीवर गेला आणि आंघोळ केली. सर्वांना घेऊन तो देवळांत गेला आणि भजन केलें. "अघाडी चले रामराजा, पिछाडी संतनका फौजा"!

दुसऱ्या दिवसापासून आखाडयांत जागा कमी पडूं लागली. शेतीवरचें काम माणसांना पुरेनासें झालें. सायंकाळचा नगारा, लाठी बोथाटयांची फैर–आणि सर्वत्र जसा हा असेच. सर्वांना जणु हा दिसेच!

भरताची ही लोकप्रियता त्या गावापुरतीच मर्यादित नव्हती. त्याने सर्व आसमंत भारून टाकलें होतें. सर्वांच्या हृदयीं तो कोरला गेला होता. लोक म्हणत त्याला आंतलें कळतें आणि ऐकूं येतें. तुळसा म्हातारी म्हणे, त्याच्या कानाला पंख आहेत. एरवी माझी सून दुपवली, आणि तिला औषधपाणी मिळालें नाही हें त्याला कसें कळलें असतें? तो तर इथे नव्हता त्या वेळीं! इस्माइल पिंजारी म्हणे, त्याच्या मनाला डोळे आहेत. तसे नसते तर माझा गुदस्ता पाय मोडला तो त्याला इतक्या दुरून कसा दिसला असता? आणि त्याने डॉक्टर कसा पाठविला असता? राधा मराठीण म्हणे, त्याला गुप्त विद्या येते, नाही तर मागे माझ्या राजारामाला झंडयांत गोळी लागली, सारा गाव पोलिसांनी पाहऱ्याखाली दाबला, माझ्या घरचीं गाडगीं मडकीं, विळे कोयते, चांडाळांनी नेले तेव्हा काळाला चुकवून डोक्यावर इनाम असतां आवसेला मध्यरात्रीं 'राजाराम', 'राजाराम' करीत माझ्या दारावर कशी थाप मारली असती त्याने? आणि राजारामाला माडी कशी देववली असती त्याच्याने!

त्या सर्व लोकांची अशी निष्ठा होती की त्याचे हात आमचीं दुःखें दूर करण्यासाठी, त्याचे पाय आम्हाकारणें धावून येण्यासाठी, त्याचे डोळे आम्हांला निववण्यासाठी !

याच कारणाने धनवाडी त्याच्या कटाक्षावर झुलत होती !

हृदयपरिवर्तनाचा त्याचा सिद्धांत ! तो स्वतः वागला आणि त्याने आपलेपणाने इतरांकडे पाहिलें. नदीला वाघ, सिंह, गाईगुरें सारखींच ! चोरांनी कधी त्याला विष घातलें नाहीं. मारेकऱ्यांनी त्याला इजा केली नाही. उलट आपल्या घामाने आपली भाकरी भिजविण्याची करामत त्याच लोकांनी भरतास्तव करून दाखविली.

आकाशांत चंद्र येतो आणि सरोवरांतील कमलें फुलतात. क्षितिजावर सूर्य येतो आणि सूर्यमुखीचा बारा तासांचा कार्यक्रम निश्चित होतो. तशीं धनवाडीचीं सर्व कामें प्रसन्न चित्ताने अविरत कुशलतेने चाललीं होतीं.

चारदोन दिवस सर्वच धामधूम होती. भरताला सर्वांना भेटतां भेटतां दिवस रात्री अपुऱ्या पडल्या होत्या. चौथ्या दिवशींच्या पहाटे तो नवीन उपक्रमासाठी निघाला. वाटेंत येतांना शेतांच्या पांघणी-जवळचा रस्ता अगदी खराब झालेला त्याने पाहिला होता. उसंत मिळतांच चार आठ दिवसांत सर्वांच्या मदतीने तो नीट करून टाकण्याची त्याची मनीषा होती. तो गावाबाहेर पडला तेव्हा क्षितिजावरचा सूर्य आणि तुळसा म्हातारी दोघेंहि त्याला एकदम भेटलीं. सूर्याला त्याने नमस्कार केला. आणि तुळसाचे हात आपल्या डोळ्यांवर ठेवले. तिच्या हाताला कढत पाणी लागलें आणि—

# परिवर्तन

"मला म्हातारीला रडायला येत नाही आणि तूं माणसाचा जन्म घेऊन या तरण्याताठ्या उमरींत डोळे ओले करतोस? दौलत गेला म्हणून काय झालें? तूं माझा कान्हया आणि जयरामाहि घेऊन जा. माझी ना नाही."—

लाकडांची वखार असलेलें कर्णपूरचें स्टेशन जाळल्याच्या आरोपाने प्रथम फाशीची आणि नंतर जन्मठेपीची शिक्षा झालेल्या दौलताच्या म्हाताऱ्या आईचें तें वेदवाक्य आणि ज्याच्या पायीं दौलती हें सर्व करूं गेला होता तो समोर उभा असतांना!

"छे, मोठी माय! मीं रडत नाही. पहाटच्या दवाने ओले झाले तुझे हात! सकाळपासून मी भटकतो आहें. पण मोठी माय, परवांपर्यंत लोखंडाच्या भांड्यात खाऊन खाऊन कंटाळलों. भूकहि गेली नाही. तूं कधी घालणार जेऊं?"

"आज, आता चल घरीं. चटणी भाकर तयार आहे. कान्ह्या जैराम थोड्या वेळांत आता जेवायला बसतीलच."

"आता नाही, अझून थोडें काम करून पोट रिकामें करतों आणि दुपारीं येतों. अट एक. रोजचें जें होतें तें खाईन. नवीन कांही नाही."

दुपारीं बाराला कान्हया आणि जैरामने म्हातारीला त्याच्या येण्याची खबर दिली. तिने त्याला पाय धुवायला पाणी दिलें. कान्हयाने घोगडें आंथरलें. जैरामने थाळें घेतलें. म्हातारीने रोजचें अन्न वाढलें. जाड एकेक ज्वारीची भाकर आणि लाल सुरंग तिखटाचा चरचरीत ठेचा. सर्वांनी पाण्याच्या लोट्यावर हात ठेविला आणि जेवायला

सुरवात केली.

भरताने पहिला घास उचलला आणि त्याला असा चटका बसला की त्याची तिडिक अगदी ब्रह्मांडापर्यंत जाऊन पोचली. एका घासाबरोबर त्याने अर्धा लोटा पाणी पोटांत घातलें. डोळ्यांतून धारा, जिभेला फोड, घशांत खवखव आणि ठसका—!

" कांरे, रोजचेंच अन्न पाहिजे होतें ना ? "

" मग ? कुठे काय झालें ? अग, हा नुसता ठसका लागला. दौलतच्या जेवणाची जेलमधली हीच वेळ बरें ! त्याने आठवण केली माझी. त्याला दिसलें मी इथे आहें म्हणून. "

तुळसा कांही बोलली नाही. पण आईच्या मनाने तिने जाणून घेतलें. लगबगीने शेजारीं जाऊन मूठभर भुइमुगाच्या शेंगा आणल्या तिने व त्याच्या थाळींत टाकीत ती म्हणाली,

" हें खा जरा म्हणजे तुझी जीभ निवेल. "

" मोठी माय ! या पांच सात वर्षांत मी तिखट बिलकूल सोडून दिलें आहे. तिखटाने तब्यत बिघडते. तिखट खाण्याचें धर्मांत लिहिलें नाही, उलट खाऊं नये असेंच आहे. मीं पुष्कळ विचार केला आणि आता सगळ्यांना सांगत सुटतों की तिखट सोडून द्या. आहांत त्या परीस चांगले दिसाल आणि शक्तीहि वाढेल. शत्रूला शहाणपणाने जिंकतां येईल."

आहारशुद्धीचा सिद्धांत आज त्याने स्वतःच्या किंमतीने तेथे सांगून टाकला. त्या डोळ्यांतील धारा बराच वेळ बंद झाल्या नव्हत्या. आणि त्याचा परिणाम जवळ बसलेल्या तेरा आणि पंधरा

वर्षाच्या कान्ह्या जैरामवर फार झाला. आपल्या पहाडासारख्या भावाने ज्याची आण पुरी व्हावी म्हणून बहादुरी केली होती आणि जिची किंमत तो देत होता, ज्याला सारं गाव देवासारखें मानतें तो आमच्या भावाच्या नात्याने आमच्याकडे यावा व त्याच्या डोळ्यांतून पाणी वहावें !

त्यांनी त्या दिवसापासून तिखटाची बीहि पानांत घेतली नाही. गावचा रस्ता नीट करायला सर्वांबरोबर तेहि मोठ्या उत्साहाने जात आणि मन लावून काम करीत.

पांधणीजवळचा रस्ता पूर्णतः दुरुस्त झाला होता, त्यांचा खळगे बुजले होते. वरून कोरड्या मातीची चादर टाकण्यांत आली होती. सुंदर बैलांचे छकडे जोडीजोडीने भरधाव रस्त्यावरून धावून गेले व गावकऱ्यांनी हसून खेळून दिवस साजरा केला.

त्यानंतरचा दुसरा कीं तिसरा दिवस. भरत अखाड्याच्या ओटीवर सूत कांतीत बसला होता. भोंवती मंडळी बसून चर्चा करीत होती. इतक्यांत कान्ह्या जैराम गुपचूप येऊन बसले. तो सांगत असलेल्या गोष्टी लक्ष लावून ऐकण्याचा त्यांनी प्रयत्न केला. पण कांही केल्या मन एकाग्र होईना. भरतने त्यांची चलबिचल ओळखली आणि शंकित मनाने विचारलें—

" कां रे ? दौलतचा कागद बिगद आला कां ? त्यांचा हात पाय ठीक आहेना ? "

" कागद आला नाही. अजून वेळ आहे यायला-"

" मग कशाला आलां तें सांगा. कांही काम आहे माझ्याशी ?"

" होय. "

" जरूरीचें ? "

उत्तर नाही. मुलांनी आजूबाजूला मंडळीकडे पाहिलें आणि तीं चूप बसलीं.

" सांगा इथंच, कांही हरकत नाही. "

" तुम्ही आमच्या आईला कांही व्रत सांगितलें ? "

" मी ? नाहीतर !"

" पण ती म्हणाली, तुम्ही जेवायला आलांत त्या दिवशीं दौलती लवकर सुटावा म्हणून व्रत सांगितलें. "

" असें ? बरें मग ? "

" कांही नाही. त्या दिवसापासून ती सकाळची कोरभर भाकर खाते. सायंकाळीं पाणी पिऊन राहते. चेहरा सुकला आहे तिचा या सहा दिवसांत. काल आम्ही बाहेर गेलो तेव्हा पांघरूण घेऊन निजून होती. आम्ही येतांच कामाला लागली. "

" बरं जा तुम्ही. मी संध्याकाळीं विचारीन मोठी मायला. "

मुलें उठून गेलीं. भरत अस्वस्थ झाला. आपलीं सर्व कामें उरकून त्यानें दौलताच्या आईचें घर गाठलें. कान्ह्या जैराम घरीं होते. आई गवताचा भारा घेऊन घरीं परतली नव्हती.

" कुठे जाते रे गवत घ्यायला ? "

" त्या शिवटेकडीच्या खाली नदीकिनाऱ्याने. "

भरत त्या बाजूला निघाला. तिसांज काळी झाली होती. पक्षी परतले होते. गुरांच्या पावलांनी उडालेली रस्त्यावरची धूळ खाली

बसत चालली होती. व थोडया अंतरावर एका झाडाखाली गवताचा भारा ठेवून तुळसा विसावा घेत होती. भरताने तिला गाठलें.

" मोठी माय! हें व्रत तुला कोणी सांगितलें ?"

" कोणतें ?"

" हें कोरभर भाकर खाण्याचें. असल्या उपासातापासाने या जमान्यांत माणसें सुटत नाहीत. मला माहीत आहे, त्या दिवशीं माझ्या येण्याने तुला दौलतीची खूप आठवण झाली असेल व..."

" हें कळलें कसें तुला ?"

" आज कान्हया जैराम म्हणत होते. "

" नाही राहवलें त्यांच्यांनी ? तरी मी सांगितलें होते त्यांना. काय करावं ह्या पोराचं ?"

" त्यांचं कांही करायचं नाही, तुझं काय करू सांग. उपास-तापास सोडून दे."

" कसे सोडूं ? "

" कां ? त्यांत काय अडचण आहे ? "

" त्यांत बांधा कांहीच नाही ? कान्हया जैरामने तुझ्या सांगण्यावरून तिखट सोडलं !"

" मग काय, चांगलंच झालं. कशी शहाणी भाऊजोडी आहे माझ्या दौलतची ! "

" शहाणीं ग्वरीं पण पोटभर जेवतात ना ? "

" म्हणजे ? तूं काय म्हणतेस तेंच समजत नाहीं मला."

" असं ? हं, खरं आहे तें. माझ्या दौलतीच्या दोस्ता! या

तीन चार वर्षांत तूं झाला आहेस तालेवार. तुला नाही समजणार गरिबांचें बोलणें आता. मी थकली आहें. कान्हया जैरामला अजून कामाला लावीत नाही. माझी कमाई नी काय ? चार भाकरीची ज्वारी आजच्या दिवसांत कशी तरी जमवितें; तिखटाचा पेंड असला की एकेका भाकरींत मुलांचें जेवण आटपे. लोटा दीड लोटा पाणी पोटांत जाई व पोट भरून ते ढेकर देत. पण आता अर्धा लोटा पाण्यांत त्यांचें होतें आणि दोन भाकरींनीहि त्यांचें पोट भरत नाही. खपाराकडे पाहून खाली मान घालून उठतात. कोर अर्ध कोर माझ्यासाठी उरते. माझ्याने चार भाकरी संपेपर्यंत त्यांना उटा म्हणवत नाही रे बाबा ! त्यांचें वाढतें वय; माझें म्हातारीचें काय ! ”

ती भारा उचलायला लागली. भरताने स्वतःच्या डोक्यावर तो. घेतला आणि म्हातारीच्या खांद्यावर हात ठेवून सुन्न मनाने चालूं लागला. तुळसा त्याच्या आश्रयाने पावलें टाकूं लागली....

“ भरत, तूं म्हणतोस सगळं एकदम बदललं पाहिजे. सगळं एकदमच चांगलं झालं पाहिजे. आम्हाला घोड्याच्या पायानं कसं चालतां येईल ? आमचीं मनें तुझींच आहेत. आजूबाजू बदलूं दे. आम्ही तर तुझींच ना ? आणि तूंहि आमचाच. ...दौलताचा कागद कधी येईल रे आता ? ”

आता भोवताली सर्व अंधार होता. शुक्राची चांदणी वर येऊन टपोऱ्या कळीसारखी आकाशांत फुलली होती. तुळसाच्या घरीं भरताने भारा खाली ठेवला; तरी त्याची नजर त्या चांदणीवरून ढळली नाही आणि तो एक शब्दहि बोलला नाही !

वर्धा, २२–९–४५

## ५ जीवनधर्म

आगगाडींत पुष्कळदा वेळ जात नाही. बाकावर पसरलेल्या वळकटीवर पडून आपण गाणें गुणगुणत असतों. किंवा एकादें पुस्तक समोर असतें. अशा वेळीं एकादी मनोहर व्यक्ति त्या डब्यांत असली, तिच्याकडे आपलें लक्ष वेधलें, तिच्या हालचालीचें कुतूहल आपल्या मनांत भरलें, ओठावरच्या लालीने मनाला आल्हाद वाटला, डोळ्यांतील चमक मन ओढून घेऊं लागली, म्हणजे त्या व्यक्तीची आठवण मनांत राहून जाते. जें पुस्तक आपण वाचीत पडलों असतों किंवा जें गाणें गुणगुणत मनाची करमणूक करून घेत असतों त्या गाण्याशीं अचानक, अजाणतां त्या व्यक्तीचा संबंध जोडला जातो.

शाम गाडीने प्रवास करीत होता. बाहेर पहाण्यासारखें कांही नव्हतें म्हणून त्याने आपलें तोंड आंत घेतलें व दिव्याकडे पहात गाणें गुणगुणत तो पडून राहिला :—

**“ वृषभानु लली की दशा सुनो ‘ दासजु ’**
**देत ठगौरी ठगाई गई**

बरसाने गई दधी बेचनको
तहँ आपही आप बिकाई गई ॥ ”

राधा दहीं विकायला गेली आणि ती स्वतःच विकली गेली. ज्याला मोहविण्यासाठी तिने शृंगार केला त्याला पाहून तीच मोहित झाली. ज्या जादूने ही ठगविणारी ठगविली गेली ती जादू आणि तो जादूगार !

एका स्टेशनवर एक व्यक्ति डब्यांत शिरली. शामचें लक्ष तिकडे वेधलें गेलें !

तिने केतकी रंगाचें रेशमी वस्त्र परिधान केलें होतें. तिचा वर्ण तिच्या वस्त्रासारखाच गोरा होता. तिचें कपाळ बरेंच मोठें होतें. नाक थोडें लांबट. ओठ सुंदर असून डोळे टपोरे आणि सतेज होते.

ती शीख तरुणी शामच्या समोरील बाकावरच बसली. शाम उठून बसला आणि तिच्या मागून आलेल्या शीख तरुणास त्याने जागा करून दिली.

त्यांची ओळख आणि गप्पा सुद्धा सुरू व्हायला एका स्टेश-नाच्या वर अवधि लागला नाही. त्या तरुणीशी बोलतां बोलतां शामने तिच्या लांबसडक केसापासून तों तिच्या नैसर्गिक गुलाबी रंग असलेल्या नखांपर्यंत व तिच्या उघडया मानेपासून तो तलम ओढणींतून दिसणाऱ्या तिच्या गळयांतील टपोर मोत्यांच्या माळेपर्यंत जो जो भाग दृष्टीस पडेल तो तो त्याने आपल्या मनात भरून ठेवला होता.

दुसरें स्टेशन आलें. तिसऱ्या स्टेशनवर त्याला उतरायचें होतें. मुक्काम येतांच त्याने त्या मंडळीचा निरोप घेतला. त्या तरुणीकडे पाहून त्याने अभिवादन केलें. दोघांच्या नजरा भिडल्या. तिचें मुख-कमल फुलल्यासारखें विकसित झालें. श्याम पण हसला आणि समाधानाने खाली उतरून चालायला लागला.

सरळ घाईघाईने येऊन आपल्या खोलीचें त्यानें दार उघडलें. कपडे तसेच फेकले व लाकडी फळीवर ठेवलेल्या पांढऱ्या कागदावर त्याची पेंसिल फिरूं लागली. ज्या आकृतीनें त्याला वेड लावलें होतें ती आकृति, ती व्यक्ति कागदावर स्थिर होत होती.

तीन दिवस सारखें बसून त्याने ती आकृति पूर्ण केली. कधी त्याला वाटे भुवया चुकल्या, कधी त्याची कल्पना होई, डोळयांत तेज पुरेसें आलें नाही. ओढणीचा पदर व्यवस्थित झाला नाही. पुनः त्यानें तें गाणें गुणगुणावें, पुनः ती आकृती मनाच्या डोळयांसमोर यावी. पुनः त्याचें अवलोकन आणि तदनुषंगिक फरक सुरू व्हावेत.

चित्र त्याच्या अगदी मनासारखें झालें. नंतर तो उठला. त्याने खोली स्वच्छ केली व बराच वेळ तो त्या चित्राकडे पहात राहिला.

त्याची ती खोली व एकटयाचा संसार. एका कोपऱ्यांत स्वयं-पाकाचें सामान, दुसऱ्या कोपऱ्यांत रंगाच्या वड्या, ड्रॉइंगपेपर आणि त्याचा बोर्ड, तिसऱ्या कोपऱ्यांत कपडे, दाराजवळ केरसुणी, शेजारींच त्याच्या वहाणा. येवढाच त्याचा संसार आणि हेच त्याचे सगेसोयरे. त्याच्याकडे येणार कोण ?

तथापि त्याच्या सौंदर्याच्या उपासनेंत कसलाहि प्रत्यवाय आला नाही. ज्या कलेच्या आमवृत्तीने ही दशा आणली तिचीच उपासना करण्यांत त्याला जीवनसाफल्य वाटूं लागलें.

या त्याच्या उपासनेंत त्याला कुणी कधी प्रोत्साहन दिलें नव्हतें. कुणी साथ दिली नव्हती. कुणी त्याची पाठ थोपटली नव्हती. निवळ समाधानाचे शब्दहि आपल्या म्हणून मानलेल्या माणसांनी कधी काढले नव्हते. उलट उपहासच त्याच्या वाटयाला आला होता.

तो जगांत एकटाच होता अशांतला भाग नव्हता. त्याला एक वडील कमावता भाऊ होता. एक बरोबरीची बहीण होती. घरी स्थिति दिवंगत वडिलांच्या कृपेने बरी असल्याने घरचा आधारहि होता.

त्याची बुद्धि बरी होती. शिक्षकांचाहि तो आवडता होता. लहानपणीं त्याने एकादें चित्र काढावें. तें पाहून शिक्षकानी म्हणावें— "सुंदर". शामला तेवढयाने समाधान वाटावें. त्याने उत्साहाने चित्रें काढावींत. चित्रकलेची त्याला बालपणापासूनची हौस. साधीं सुंदर दृश्येंहि स्वतःचीं करून सोडल्याशिवाय त्याला चैन पडत नसे. एकादी सुंदर चिमणी एकाद्या चिमुकल्या जाईच्या फांदीवर तोंडांत चार दोन जाईच्या कळया घेऊन बसलेली दिसली तरी सर्व कामें आणि अभ्यास टाकून तो तें दृश्य आपलेंसें करी. आणि याच वेळीं त्याच्याशी आणि भोंवतालच्या जगाशी संघर्ष सुरु होई. लहान मुलांचे संघर्ष त्यांच्या मानाने महानच असतात. आजूबाजूचीं माणसें नित्यकर्मांना कर्तव्य समजतात. त्या कर्तव्यांपासून पराङ्मुख होणें म्हणजे महादोष. सबंध आयुष्य कर्तव्यपर घालवूनहि चेहरा न फुललेलीं माणसें जगांत असंख्य

असतात. पण त्याचें जगाला काय होय ? आई आणि ईश्वर दोनच असे असतात की त्यांच्या राज्यांत मुलांना आणि भक्तांना नित्यकर्माच्या कर्तव्यांतून ढळल्यामुळे शिक्षा होत नाही. शामला आई नव्हती आणि देव आजवर फार थोडयांना दिसला आहे.

घरच्या माणसांना शामची ही कर्मच्युति पसंत नव्हती. त्यामुळे त्याला त्याची आवड सर्वांच्या मनाविरुद्ध चालवावी लागली. आपण काढलेलीं, आपल्याला सुंदर वाटलेलीं चित्रें आपल्या खोलींत व्यवस्थित लावण्याच्या गुन्हयाबद्दलहि त्याला बाळपणीं मार खावा लागला. मारल्याने कच्च्या मडक्यांना आकार जरूर येतो पण तो मारणाऱ्याच्या मनासारखा येत नाही येवढेंच.

शाम चित्र काढीत बसे. त्याची बहीण सुभद्रा आंत येई— "शामू, मला लेस आणून दे आत्ता. मला बाईनी विणून आणायला सांगितलें."

"सुभाताई, तूं आता मला मुळीच त्रास देऊं नकोस. सायंकाळीं गाडाभर कामें करीन."

सुभद्रेचा विरस व्हावा. तिने संतापावें. गोंधळ करावा आणि दोघांनी मिळून यथेच्छ मार खावा. चित्रहि गेलें. लेसहि बाजारांत राहिली.

शामचें मन पक्कें झालें. सुभीचें बिथरलें. शामची कागाळी तिच्या नित्यकर्मांत सामिल झाली. त्यामुळे परस्परांचीं मनें उतरून गेलीं.

तो आता सोळा वर्षांचा झाला होता. त्याला आता समजूं लागलें होतें. एक दिवस असा निघाला की त्याच्या दादाने त्याचीं आजवरचीं सर्व चित्रें संतापून फाडून फेकून दिलीं. शाम आततायीपणाने बाहेर निघून जावयास सिद्ध झाला. सुभाताईची एकदा भेट घ्यावी म्हणून तो तिच्याकडे गेला.

"सुभाताई, आजवर मी तुला कांही बोललों असेन तें विसरून जा. तुझी माझी भेट आता तुझ्या सासरीं..."

मध्येच सुभद्रेने तोऱ्याने उत्तर दिलें,

"कांही नको भेट व्हायला. सख्या भावाची मर्जी राखता आली नाही. तूं बहिणीला काय सांभाळून नेणार आहेस."

जन्मापासूनचें राहतें घर सोडतांना शामचा गळा दाटून आला. त्यांत पुनः या उत्तराची भर पडली.

त्या दिवसापासून त्याने नागपुरच्या या आपल्या खोलींत मुक्काम ठोकला होता. त्याची दैना होत होती. पण कसेंहि, कितीहि आणि केव्हाहि खाऊन तो जगूं शकत होता. त्याची दिवसेंदिवस प्रगति होत होती. व त्याच्या कलोपासनेंत खंड नव्हता. तेंच त्याचें सुख होतें.

आणि ज्या दिवशीं शामने ती कलाकृति पूर्ण केली, त्या दिवशीं त्याला कितीपण समाधान झालें. कुणाशीं तरी बोलावें, कुणाबरोबर तरी फिरावें असें त्याला फार फार वाटलें. त्याच्या प्रसन्न चित्तवृत्तीच्या प्रसभासाठी त्याला सहानुभविता हवा होता.

पण त्या वेळीं आपलें मायेचें असें कोण मिळणार ? " आज सुभद्रा असती तर इतकें सुंदर चित्र पाहून ती खात्रीने माझ्याशी आनंदाने बोलली असती." इतके दिवसांनीहि तो आपल्या बहिणीला विसरूं शकला नव्हता.

पहाटे उठून त्याने चित्राच्या चौकटींत रंग भरला. आणि सहज फिरायला म्हणून तो बाहेर पडला. पहाट संपत आली होती. ढगाआडची सूर्याची करामत जगाला दिसूं लागली होती. सूर्य शुचिर्भूत होऊन हसत मुखाने वर येत होता. शाम बराच वेळ उगवत्या दिशेला चालला होता.

परत येतांना त्याचें मन उल्लसित झालें होतें. तितक्यांत त्याला संभाषण ऐकूं आलें. एका दारांत दोन व्यक्ति बोलत होत्या—

" दादा, ही कां रे तुझी माया ? " एका युवतीचा आवाज.

" प्रमे, असं बोलायचं नाही. पण आज राहून तरी काय होणार ? तुला कालच सासरचें बोलावणं आलें. "

" पण दादा, राहिनास कां ! मी राहत्यें आणि तूं सुद्धा. उद्या तूं पुण्याला जा नि मी सासरीं—"

आणि पुढचे बोल आंत जाऊन विरले. शाम पुढे चालूं लागला.

एक दिवस रहात नाही म्हणून ही प्रमिला आपल्या भावाला प्रेमाची आण घालते, आणि आपण घरांतून कायमचे निघून जात असतांहि सुभद्रेचें तोंड शुभ बोलत नाही. आपल्या जन्माबरोबर आपल्या वाट्याचें वात्सल्य मेलें....

त्याला जसजसें प्रमिलेचें चित्र दृग्गोचर होऊं लागलें तसतशी त्याला सुभद्रेची जास्त आठवण होऊं लागली. त्याच्या मनांत कल्पना आली, सुभीच्या गावाला जावें. ती आता सासरीं गेली आहे. आपल्या-सारखीच आपल्या माणसांपासून आता दूर झाली आहे. तिच्या मनांतील अढी आता निघून गेली असेल. तिला कदाचित् आपली आठवणहि येत असेल. अखेर कितीहि झालें तरी बहिण आहे. रक्ताचें नातें कधी ना कधी सांधलें हें जायचेंच. हवा तो छळ केला तरी पुत्राच्या मुखीं दुधाची अमृतधारा घालणाऱ्या मातांच्या, लाथेने तुडविलें तरी ती लाथ दुखावली म्हणून चोळणाऱ्या बहिणींच्या कथा परंपरेने त्याच्यापर्यंत पोचलेल्या होत्या. आपल्या बहिणीच्या बाबतींतहि हजारों वर्षांचें सत्य एकदम खोटें थोडेंच होणार आहे ?

हा विचार त्याला फार समाधानकारक वाटला. त्या दिशेने त्याची कल्पना त्याला सुभद्रेकडे नेऊं लागली.

सुभद्रेला देणार काय ? हेंच सुंदर चित्र देईन तिला. त्याने आपल्या अप्रतिम कलाविलासाकडे पहात मनाशी ठरविलें. ती माझ्या या चित्राला तरी वाईट म्हणणें शक्य नाही.

किती आतुर झाला होता तो ? त्याने आपल्या मनाच्या मापाने सुभद्रेचें मन मोजलें आणि निष्कर्ष काढला की सुभद्राहि आपल्या भेटीसाठी आतुर झाली आहे.

तो स्टेशनवर उतरला आणि पत्ता काढीत त्याने सुभद्रेचें घर शोधिलें.

" कोण पाहिजे तुम्हांला ? " एका पंचवीस वर्षांच्या

तरुणाने त्याच्याकडे निरखून पहात प्रश्न केला. त्याला आपल्या पत्नीच्या आणि समोरच्या चेहऱ्यांत साम्य दिसलें.

" सुभाताई आहे कां ? " शामने विचारलें.

" होय आंत या ना ? मी पाठवितो. "

शाम तेथेंच थोडा वेळ घुटमळला. सुभद्रा बाहेर आली.

" सुभाताई, " त्याने उमाळयाने हाक मारली.

तिने एकदा विस्मयाने त्याच्याकडे पाहिलें व त्याला प्रश्न केला, " कुठून आलास ? "

" नागपूरहून सरळ— "

" का दादाकडे गेला नाहीस ? "

" नाही, कां ? "

" मग माझ्याबद्दलच येवढा उमाळा ? तो देखील तुझा भाऊ ना ? बरं आंत येशील कीं.... "

तिच्या मनातील अढी अजून निघाली नव्हती. तहान लागली म्हणून ओढ्यावर जावें व पाण्यांत किडे झालेले असावे. इतका वेळपर्यंत तळमळणाऱ्या माशाला वाळवंटाच्या उन्हाचा चटका सहन झाला नाही.

" सुभद्रा, उमाळा नसता तर असा अनाहूत आलोच नसतो. तुला माझी कधी गरज पडली होती किंवा पडणार आहे म्हणून तूं मला भाऊ म्हणावें ? असंच तुझं म्हणणं ना ? ठीक...."

तो आल्या पावलींच परतला. शोक, विरस, उद्वेग यांनी तो अभिभूत झाला यांत नवल नाही; पण त्याच्या डोळयांतील

रंग बदलले. ताजमहाल कोसळल्याची जणुं त्याच्या कानीं वार्ता आली. हजारों वर्षांच्या परंपरेने जें सौंदर्य टिकून राहिलें तेंच निखळल्याचें जणू आज त्याच्या प्रत्ययास आलें.

आगगाडींत बसल्यावर त्याने आपल्या मनाचे डोळेच तेवढे उघडे ठेविले.

दुसऱ्याच्या बाहिणी किती चांगल्या ! पण तेहि दूरचे डोंगरच असतील !

त्याने आपल्या खोलीचें दार उघडलें. प्रकाशाचा मोठा झोत समोरच्या भिंतीवर पडला. त्याच भिंतीला त्याचें आवडतें नवें चित्र उभें केलें होतें.

त्याने त्या चित्रावरील कापड दूर केलें. जें दिसतें, जें असतें, तें असत्य भासलें की जें दिसत नाही आणि भासत नाही तें सत्य मानावें लागतें. मानवी जीव एकदम असा अंधाराने, निराशेने गडप होत नाही. विशाल वृक्षाच्या मुळ्या जवळ पाणी नसलें तर आणखी लांब होतात, खोलवर जातात, आणि तेथून पाणी शोषून झाडाला जगवितात. त्याला मुकूं देत नाहीत. त्या पाण्याकडे जातात आणि पाणी— जीवन—त्यांच्याकडे येतें.

त्या शीघ्र तरुणीच्या सतेज नयनकमलांतून त्याचें सर्व जीवनार्थ काढावयाची त्याच्या मनाची आता तयारी झाली होती. तिच्या उमलत्या ओठांतून जणुं अमृततुल्य मधुर शब्दांचा वर्षाव होत होता. ती त्याच्याशी हितगुज करीत असल्याचा त्याला भास होत होता.

बहीण जिवंत आहे पण तिचें दार भाऊबिजेलाहि बंद असतें. या माझ्या खोलीचें दार मींच उघडलें. मनाच्या खिडकींतून जीं जीं दारें उघडीं दिसतील त्यांतून बिजच्या अक्षता आपल्या डोक्यावर पडतील. आई नाही. तिचा या शरीरावर कधी हात फिरला नाही. शरीराचीं दारें बंद केलीं तर मनाच्या भांडारांतून दुधाच्या धारा मुखीं पडतील !

म्हणून जें जें अंतर्मनाच्या प्रेरणेने प्रत्यक्षांत फुललें तें तें माझें—माझेंच !

त्याची नजर त्या अप्रतिम कलाकृतीवर आपलेपणाने स्थिर झाली. खिडकींतून एक चिमणी आंत येऊन आढयाच्या लाकडावर बसली. तिच्या चिंवचिंवींतून निसटून कांहीसें त्याच्या जवळच पडलें. तांदळाच्या चार दोन कण्या होत्या त्या ! दुधासारख्या शुभ्र, निर्मल ! त्याच्या खोलींतील सर्वच वस्तू सजीव झाल्या जणु !

आणि त्यानंतर त्याच्या कलाकृतीला सर्वोत्तम बक्षीस मिळण्याची त्याच्या व्यवसाय बंधूंनी खात्री भरली होती.

पण मग तो एकटाच राहिला असता.

आणि तीच व्यथा त्याला टाळावयाची होती.

वर्धा, ३०-८-४५

# अतिथि देवो भव !

कालपासून पावसाचा थेंब खंडला होता. जरूरीच्या ठिकाणीं पाऊस पाडायला ढग निघून गेले होते. आकाश रात्रींपासूनच स्वच्छ होतें. हवेंत सुखद असा गारवा आला होता. गाढ झोपून सकाळीं त्या गावचीं माणसें जेव्हा उठलीं तेव्हा गावच्या टेकडीवरून प्रसन्नपणें सूर्यबिंब वर येतांना त्यांनी पाहिलें.

बायजा शेतांतून पहाटे परत आली आणि घाईघाईने तिने आपलीं कामें यंत्रापेक्षाहि चांगलीं आणि जलद रीतीने आटोपण्यास सुरुवात केली. यंत्रापेक्षा चांगलीं अशा अर्थाने की त्यांत तिने आपलें हृदय ओतलें होतें. प्रत्येक उरकलेल्या कामांत तिचा, तिच्या पतीचा, तिच्या मुलाचा, तिच्या पांढऱ्या आणि लाल बैलजोडीचा संबंध येत होता. गेल्या कित्येक वर्षांपासून आपले मानलेले ते जीव होते. त्यांना तिने आपल्या हातचें अन्न आणि हृदयांतला जिव्हाळा देऊन पुष्ट, प्रसन्न, सुखी केलें होतें.

आणि गेल्या आठ दहा महिन्यांत तर तिच्या कामाला जणूं भर आला होता. वीस ते तीस वर्षांच्या ऐन उमेदींत, ज्या उत्साहाने, हिरीरीने, आशा–आकांक्षेने माणूस कष्ट करतो त्याच उमेदीने

तिने आपल्या घरचें आणि शेताचें काम केलें होतें. कष्टच केवळ ज्यांच्या वाट्याला आलेले आहेत त्यांना हें उमेदीचें वय लाभत नसतें म्हणूनच केवळ त्याची उपमा द्यावयाची. आमच्या या गरीब देशाच्या अनुभवाच्या विज्ञानशाळेंत अनेकांनी खपून जे आराखडे तयार केले, त्यांतून असा एक निष्कर्ष निघून पक्का झाला आहे, की या देशांतील कष्टाळू वर्गातील स्त्रियांना वीस ते तीस हें वयच्च नसतें. वीस वर्षेपर्यंत त्या वाढतात आणि त्यानंतर एकदम त्यांच्या वयाचा आकडा एकतीसपासून सुरू होतो. ज्या वयांत स्त्रीने प्रौढेचें, अनुभवाचें, उपभोगाचें जीवन विश्वस्तपणें घालवावें ती दशाच्च हजारों कारणांमुळे त्यांना लाभत नसते. सकाळीं सूर्य कासराभर वर यावा आणि पुढे ढगांचीं, अंधाराचीं, श्रमाचीं पटलें एकाएकीं आकाशीं झाकळून येऊन चार वाजतां पिवळें ऊन पाडीत सूर्याने अस्तगिरी उतरूं लागावें अशी स्त्रीच्या आयुष्याची करुणकहाणी डोळे असलेल्या अनेकांनी पाहून – सांगून ठेवली आहे. सबब ‘ कुंकवाचा टिळा ’ लावून ‘ दुहेरी कासोटा ’ घालणारी व ‘ भाग्य-वंताची लक्ष्मी ’ दिसणारी स्त्री ध्येयस्वप्नांतील असावी असा या किसानमजुरांच्या देशांतील असंख्य जनतेने निर्वाळा दिला आहे.

म्हणूनच, उमेदीच्या वयाने बायजेने गेले आठ महिने जे अविश्रांत श्रम केले ते एका हृद्य, विलोभनीय, आशादायी अपवाद-रूप अशा कारणानेच !

तें कारण असें की ज्या पाटलाच्या घरीं बायजेचा नवरा पैकू याने वीस वर्षे काम केलें; उन्हातान्हांतून, पाऊसपाण्यांतून, खाचा-

खळग्यांतून, काट्या–गोट्यांतून कष्ट उपसून पाटलाचे मळेच्या मळे शिंपले; मालकाच्या धरीं सुवर्णधान्याच्या, रसदार फळांच्या, कसदार भाज्यांच्या पाट्याच्या पाट्या, गाड्याच्या गाड्या भरल्या तो पाटील जनदृष्टीने 'मूर्ख' निघाला होता. दुर्दैवाने शिक्षणाचे संस्कार झाले नसल्यामुळे कधी न सुधारतां येणारी 'एक चूक' त्याने करून ठेविली होती. मरते वेळीं बायजेला बोलावून त्याने तिला आपल्या हाताने कुंकू लाविलें होतें व एक आठ दहा एकरांची गादलेली, उस्तवारी न केलेली, जमिनीची काळी चादर पांघरूण म्हणून देऊन टाकली होती. तिचे कृतज्ञ हात त्याच्या पायाला लागल्यावर त्याने प्राण सोडला होता.

त्याच जमिनीची मशागत बायजी आणि पैकूने गेले आठ दहा महिने केली होती. पैकूने मालकाच्या घरची नोकरी त्याच्या परवानगीने जिव्हाळा कायम ठेऊन सोडून दिली होती. व आपलें स्वतःचें शेत उठवितांना सूर्याला जरा उशीरा अस्तास जाण्याची तो सतत प्रार्थना करीत आला होता. शेत खणण्यास आरंभ करतांना त्या पडीत जमिनींत त्याने दसऱ्याच्या दिवशीं पहिली कुदळ मारली, त्या वेळीं निघालेली ओलसर माती पैकू आणि बायजेने ओंजळींत घेऊन मनमुराद सुंगली होती. ओल्या भुईमुगासारखा त्या मातीचा सुगंध उभयतांनी जो सुंगला त्याने विलक्षण धुंदी, विलक्षण जोम, आशेचीं मधुर स्वप्नें त्यांच्या नेत्रीं तरळत होतीं, व तीं स्वप्नें प्रत्यक्षांत आणायला मुंगीसारखे, श्रावणांतील चिमण्यां-सारखे सतत श्रम, शीण मुळीहि न जाणवतां केले होते. त्या

# अ ति थि दे वो भ व !

घामाच्या धारांनी पोषण मिळून यंदा ज्वारीचे हिरवे धांडे त्यांच्या शेतांत जे उभे राहिले होते त्यांच्या मांडीभर उंचींत आणि सळसळणाऱ्या पानांत सारीं दुःखें आणि कल्मषें, लोपून, लपून गेलीं होतीं.

याच सुखाच्या धुंदींत बायजेने आज सकाळपासून आपलीं कामें उरकलीं होतीं. बैलांचें दाणापाणी करून, मुलांसाठी आणि नवऱ्यासाठी भाकरी भाजून ती बाहेर आली, तेव्हा सूर्याची तिरीप कोवळीच असलेली दिसली. पैकू बैल घेऊन शेतांत गेला. जातांना त्याने आपल्या बैलांकडे आणि बायजीकडे भरलेली नजर टाकली. तथापि त्याच्या तोंडून आज नेहमीचा आशेचा, हुरुपाचा उद्गार निघाला नाही. बायजीच्या तें ध्यानांत आलें पण त्याबद्दल वाईट वाटून घेण्यापेक्षा आपल्या सात आठ वर्षांच्या मुलाला बाजारांत नेऊन एकादें आंगडें विकत घेणेंच तिला परवडलें.

सायंकाळीं पैकू आला. थोडयाशा उदासपणेंच त्याने जेवणखिवण केलें व बायकोची आवराआवर संपण्याअगोदरच खोलींच्या कोपऱ्यांत पथारी पसरून तो आडवा झाला.

बायजेने काम आटोपलें. मुलाच्या अंगावर पांघरूण घातलें. आपल्या वाकळीच्या अलीकडील कोपऱ्यावर त्याला सरकाऊन ती आडवी होण्याचा विचार करूं लागली. मुलाला गाढ झोप लागल्याची खात्री होतांच तिने दिवा मालविला व ती पैकूच्या पथारीवर गेली. अतिश्रमांनी थकून विभक्त झोपूनच त्यांनी आज कित्येक रात्री घालविल्या होत्या. सबब आज त्याच्या शेजेवर स्वतःहून जाऊन

बसतांना तिच्या चिरपरिचित मनालाहि एक सुखाची, नाविन्याची चमक जाणवून गेली.

तिने पैकूच्या कपाळावर हात ठेवला. त्याला झोप लागली नाही हें तिच्या ध्यानांत आलें व जरा हळू, सलगीने तिने प्रश्न केला,

" आज उदाससे ? कां ? लाल्यानें पुनः आज चारापाणी नीट घेतलें नाही का ? कांही कारण ? "

" अंहं, तसें कांही नाही. "

" मग दुसरें तर मला कांहीच कारण दिसत नाही. उलट आज तर आनंदांत असायला हवें. उद्या दिवस आनंदाचा आहे. सण आहे. उद्या लाल्याढवळ्यांना साज घालावयाचा आहे. उद्या हात मोठे करायचे आहेत. पोटहि रिकामें ठेवायचें आहे उद्यासाठी ! मग असें कां ? "

" म्हणूनच विचार करतों आहें. "

" कसला ? "

" उद्या पोळयाचा सण. लाल्याढवळ्यांचा पहिला पोळा उद्या साजरा करावयाचा आहे. घरचाहि हा पहिलाच पोळा. आणि माझ्याजवळ पैसाहि नाही. हाच थोडा विचार पडला आहे."

असें म्हणून पैकूने थोडें हास्य केलें आणि बायजेच्या खांद्यावर हात ठेवला.

" मग ? झाला विचार तुमचा ? काय ठरलें ? "

" कांही तर नाहीं. परवा बांधी सुधारायला दगड हवे होते. त्यासाठी जे तीन चार रुपये खर्च झाले ते उगीच केले असें वाटतें. "

" बरें मग ? "

" मग काय ? तूं अशी काय विचारतेस आज ? जरा आनंदांतहि दिसतेस ! थकली निकली, मलूल पण दिसत नाहीस. स्वतःहून माझ्याजवळ आलीस ! काय, आहे काय ? "

" तसें कांही नाही. पण उद्या लाल्याढवळ्यांना ते अगदी खूष होउन जातील अशी पुरणपोळी खाऊं घालायची येवढेंच सांगायला आल्यें. आज बारकूला नवीन आंगडें घेतलें. पाहिलेंहि नाही तुम्ही ! विचारलेंहि नाही. दुःखें देखील उभयतां भोगलीं, मग आजचा माझा आनंद ? येवढेंच विचारावयाला आणि सांगायला आल्यें. "

" खरें ? हें सगळें आणलें कसें ? सांगशील तर ! "

" आणलें आपलें. बांधी नीट करायला तुम्ही पैसे खर्च केले त्या दिवसापासून धुऱ्याचें गवत लाल्याढवळ्यांना थोडें कमी घातलें आणि त्यांच्या पोटावर पाय देऊन गवत विकून चार पांच रुपये जमविले होते. तेवढ्यांत उद्याचा सण सहज होईल. मुक्या जनावरांच्या उपासाचें पारणेंहि फिटेल. आज गूळहि आणून ठेवला आहे. आता बोला, कशी काय आहें मी ? "

" सगळें हें खरें ? " आणि या दोन अक्षरांत सहजीवनाच्या शास्त्राचीं पुण्यसूक्तें व्यक्त होऊन गेलीं. त्यांची ती रात्र श्रावणाचा कृष्णपक्ष असूनहि चांदीसारखी गेली. घरच्या दुधावरील खरपूस

तापलेली बोटभर जाडीची साय भाकरीशीं खावी, ताज्या रवींतून झेलून काढलेला लोण्याचा गोळा तोंडांत टाकावा, इतक्या सुखाने आणि उल्लासाने त्या सबंध रात्रीं त्यांनी पुढील कार्यक्रमाचे बेत करण्यांत वेळ घालविला. डोळ्याच्या पापण्या न लावतांहि गाढ झोप, शरीर न विसावतांहि शीणाचा शम—अशी ती त्यांची रात्र गेली !

कोणत्या उद्देशाने हें आजवर कुणी सांगितलें नाही, पण पहाटेचा कोंबडा ज्या उमेदीने बाग देतो तसें पैकूने बायजेला शुक्राची चांदणी उगवतांच सांगितलें, "चल उठ. आज सूर्याला जरा लवकर हाक मारूं." उठून शुक्राच्या सांद्र प्रकाशांत तो शेताकडे गेला. पळसाचे चार 'मेढे' (फांद्या) त्याने तोडून आणले. बायजेने तोंवर आंगण झाडून स्वच्छ केलें होतें. दारांत त्याने मेढे उभे केले. आपल्या बैल-जोडीला त्याने रात्रीं हळद लोणी खांद्याला लावून जेवायला येण्याचें आमंत्रण दिलें होतेंच. उजाडतांच बैलांचे कासरे सोडून त्यांच्या शिंगांना गुंडाळले व त्यांना बाहेर काढलें.

पोळा म्हणजे आमंत्रण देऊन आपल्या घरीं बैलांना अतिथि म्हणून जेवायला बोलाविण्याचा सण. त्या दिवशीं बैलांकडून काम घ्यावयाचें नाही. त्यांचें काम माणसाने संभाळावयाचें. त्या कामाने वर्षभराच्या त्यांच्या कष्टाचा कृतज्ञतेने मोबदला चुकवावयाचा. मुलाला संभाळतों तसें त्यांना त्या दिवशीं सांभाळावयाचें. ईश्वराची अनंत, अमर्याद, मुक्तहस्त, अशी विराट दातृता, तिचा उपभोग घेणाऱ्या मानवाने ज्या भावनेने पत्रं, पुष्पं, फलं, तोयं त्याच्याच चरणीं अर्पण करून सबंध जीवन उपनिषदाच्या मंत्राप्रमाणें त्यागाने

भोगमय करण्याची भावना धरायची, त्याच भावाने एक दिवसाची सबंध सेवा बैलाच्या चरणीं वाहून आपलें जीवन विशाल, भूतदया-प्रेरित करावयाची इच्छा धरावयाची असा हा पोळयाचा दिवस— कृषिदेवतेची आज्ञा पाळावयाचा हा दिवस !

त्यांतल्या त्यांत गेले आठ महिने खपून खपून पैकूचें शेत ज्या लाल्याढवळ्यांच्या जिवावर उभविलें गेलें त्यांच्याबद्दल पैकूच्या मनांत केवढी कृतज्ञता भरली असेल ? तिचा प्रत्यय त्याने उठतां-क्षणींच बैलांच्या अंगाकरून जो हात फिरवला त्यांतून त्या मुक्या जनावरांनाहि आला.

पैकूने आपली बैलजोडी आपल्या मालकाच्या वाडयांत नेली. तरुण मालकाला आणि नव्या पाटलिणीला त्याने नमस्कार केला. आपल्या हक्काच्या घरीं येऊन कारभार करावा त्याच प्रत्ययाने त्याने आपल्या हाताखालून मोठया झालेल्या घरच्या गाईच्या दोन जोडया काढल्या व त्या सहाहि बैलांना घेऊन तो नदीवर गेला.

डोहामध्ये त्याने बैल सोडले आणि आपलें वय विसरून कांचा मारून धडाम्‌दिशी पाण्यांत उडी मारली. बैलांच्या सर्वांगावर हात फिरवून चोळून चोळून त्यांना अगदी स्वच्छ केलें. बाहेर काढून त्यांचें अंग काठावर ठेवलेल्या कोरडया उपरण्याने पुसून काढलें. शेपटीचे गोंडे हातावर ठोकून कोरडे केले आणि ओलेत्याने तो घराकडे परतला. परततांना हिरव्यागार शेताकडे पाहून त्या बैलांनी असा हंबार केला, की आजचा आमच्या पारण्याचा दिवस आम्हीं समजलों हेंच जणूं त्यांतून स्पष्टतया व्यक्त झालें. ह्या देशांतील हीं

मुकीं जनावरें अनंत काळापासून अपौरुषेय वाङ्मयाच्या मंत्राप्रमाणें नुसत्या हंबारानेहि अनेक अर्थ व्यक्त करीत आलेलीं आहेत !

उन्हांत बैलांचीं अंगें पूर्ण कोरडीं झाल्यावर त्यांचे रंग अधिकच तळपूं लागले आणि हिरव्या रानांत मनसोक्त चरायला म्हणून जेव्हा ते डोंगरमाथा चढूं लागले तेव्हा हिरव्या दाट पर्णांच्या चाफ्यावर पांढरीं लाल फुलें फुलल्याचा भास वनदेवतेलाहि झाल्यावाचून राहिला नाही !

पोटभर चरून आपल्या मनानेच बैल घराची वाट चालूं लागल्यावर पैकू त्यांच्या मागून घरीं आला. त्याने बैल अंगणांत उभे केले. मुलगा गेरूचें भांडें घेऊन बाहेर आला आणि गेरूच्या पाण्यांत आपले चिमुकले हात बुडवून त्याने बैलांच्या पाठीवर पंजे मारले. पैकूने गाडगें बुडवून त्याच्या गोल तोंडाने बैलांच्या अंगावर गोल ठिपके दिले. आकाशगंगेचा संपूर्ण पट्टा स्पष्ट दिसण्याइतक्या नितळ आकाशांत मंगळाची चांदणी तसे ते पंजे आणि ठिपके !

नंतर त्याने बैलांचीं शिंगें लाल करून त्यावर निळ्या, चंदेरी बेगडाच्या गोल गोल पट्ट्या चिकटविल्या. शिंगांच्या छिद्रांतून पांढरीं लाल सोनतागाचीं झुंबरें लेवविलीं. सोनतागाच्याच फुलमाळा कपाळावर सोडल्या. त्या ‘ माथाट्या ’ वाऱ्याने हलत आणि जास्तच फुलल्यासारख्या वाटत. कवड्यांचे पट्टे गळ्यांत घातले. रानफुलांच्या रंगीबेरंगी माळा, गुलबाक्षीचे गजरे गळ्यांत चढविले. पायाला विविधरंगी दोऱ्यांचीं पैंजणें बांधलीं. शेपट्या रंगविल्या आणि बैलांच्या विशाल डोळ्यांत आपलें, आपल्या मुलाचें, आंगणांत येऊन

उभ्या राहिलेल्या बायजेचें उमटलेलें प्रतिबिंब पाहून पैकू अगदी खूष झाला. तोंवर त्याच्या मुलाने बैलांच्या शेपट्यांचे गोंडे तोंडावरून फिरविण्यास सुरुवातहि केली होती.

तिसरा प्रहर टळला. वड्यापुरणाने भरलेल्या पत्रावळी टोपल्यांत भरून त्याने लाल्याढवळ्यांना जेऊं घातलें. बायजा हवें नको तें विचारायला दारांत येऊन उभी राहिली आणि अतिथि तृप्त झाल्याचा कौटुंबिक सहभाव सर्वांनी अनुभवला.

पुरणाच्या दोनचार पोळ्या केळीच्या पानांत बांधून त्याने बासनांत गुंडाळिल्या व कुंकवाचें डाबलें घेऊन तो पाटलाच्या घरीं आला. मूर्ख पाटलाच्या भाबड्या पोराने या विसाव्या शतकांतहि त्या प्रसादाचा स्वीकार केला आणि पैकूच्या डोईस गुलाबी फेटा बांधला.

नव्या आंगड्याने मुलगा सजला होताच. आपल्या बैलजोडीचे नवे रंगीत कासरे मोठ्या ऐटींत धरून बायजेची तृप्त नजर पति, पुत्र, अतिथि यांच्यावर खिळली असतांनाच पोळ्याच्या तोरणांत उभे करायला म्हणून त्याने बैल नदीच्या वाळवंटाकडे काढले.

आज वाळवंटांतील ओली वाळू बैलांच्या खुरन्यासाने पवित्र झाली होती. आसमंतींचें वातावरण हंबार व ललकाऱ्यांनी निनादून गेलें होतें. बैलांच्या गळ्यांत घातलेल्या घुंगुरघंट्यांचे आवाज आपल्याला हुबेहुब उठवितां यावेत म्हणून इंद्रपुरीच्या नर्तकी आकाशांत गोळा झाल्या होत्या.

आंब्यांच्या पानांचें मंगल तोरण लांब, उंच, दूरवर उभारलें होतें. खाली एका हारीनें शृंगारलेले, सजलेले, सुंदर बैल उभे केले

होते. हा सर्व सोहळा पहावयाला सूर्य उंच डोंगरमाथ्यावर येऊन बसला होता.

पाटलांच्या, गावच्या मानकऱ्यांच्या, झूल घातलेल्या, शिंगांना पेटत्या मशाली लावलेल्या, हृष्टपुष्ट, सकस, सुंदर सजलेल्या, तूप-कणिक खाऊन सौष्ठव कमाविलेल्या मस्त बैलांच्या सुरंगी जोडया, शेपटया उंच करीत, आपले कासरे संभाळणाऱ्यांना फरपटत हैराण करीत, थयथय नाचत वाऱ्याला आव्हान करीत, हुंकार हंबार देत फडांत येऊन ठाकल्या व मधोमध येऊन उभ्या राहिल्या. त्यांची यथासांग पूजा झाली. प्रसाद झाला. बैलांच्या पाठीवर थाप पडली. बंदुकीचे बार निघाले. बुजेलेले बैल, धूमधडाक्याने उन्मत्त झालेलीं माणसें—सर्व मरुभूमि रणांगणासारखी वीरश्रीने ओतप्रोत झाली. सर्वांनी तोरण लुटलें. तोरणाच्या पक्क्या दोरीच्या तुकडयातुकडया-साठी शेतकऱ्यांनी हटातट केली, हात काचून घेतले. आणि ते तुकडे कंकणासारखे, वीरभूषणासारखे मनगटांना बांधून आपल्या जोडया चौखूर उधळीत ते गावाकडे परतले.

आता सगळ्यांनी परस्परांच्या जोडयांची पूजा करावयाची. प्रत्येकाच्या आंगणांत ओळखीच्या शेतकऱ्याची जोडी उभी रहाव-याची. बैलांना जो साजशृंगार चढविला गेला त्याचें कौतुक व्हावयाचें आणि समृद्ध जीवनांत विलीन झालेल्या या कलाशृंगाराची प्रशंसा म्हणून जोडी आणणाऱ्याला आपल्या ऐपतीप्रमाणें द्रव्य द्यावयाचें आणि खाल्लेल्या अन्नाला कृतज्ञ रहावें म्हणून बैलाची पूजा करावयाची. कृषिप्रधान संस्कृतीच्या शेतकऱ्यांचा या दिवशींचा हा

सायंकाळचा कार्यक्रम !

तोरणांतून जोडी घेऊन पैक्रू घरीं आला. बैलांना घरीं बांधून बायजेने त्यांची पूजा केली. दिवसाभराचा उपवास त्या तीन माणसांच्या कुटुंबाने एका पात्रांत जेवून सोडला. आणि दोन पानांचा विडा खाऊन पैक्रू जोडी घेऊन मिरवायला ओळखीच्या घराकडे निघाला. पाटील, मानकरी, ब्राह्मण सर्व आटोपले. प्रत्येकाच्या घरीं बैलांच्या कपाळीं कुंकवाचा टिळा आणि पायावर फुलें पडलीं. पैक्रूच्या हातावर गुळाचा खडा, कानावर गोड शब्द आणि मुलाच्या हातावर अनुकूल असलेलें द्रव्य पडलें.

बैलजोडी डॉक्टरांच्या घरीं जाऊन उभी राहिली. पाटलांच्या घरामुळे इथेहि पैक्रूची ओळख होती. आपल्या मुलाचें गेल्या दुखण्यांतलें औषधपाणी त्याने याच डॉक्टराकडून केलें होतें. त्यांच्या घरीं वानगीचीं कणसें, वेलीचा भोपळा, नवतीचे पावटे, अनेकदा त्याने पोचविले होते. आणि ह्याच ओळखीने त्याने त्यांच्या दारांत पूजेला बैलजोडी आणली होती. डॉक्टर बाहेर गेले होते. पैकूने बाईला हाक मारली,

" बाई, दारीं देव आणले आहेत. पूजा करा. "

" कसली रे पैक्रू ? कोणते देव ?" बाईने येऊन विचारलें. केसांचा अंबाडा बांधीतच ती बाहेर आली.

" कसली पूजा करायची रे ? या बैलांची ?"

" हो जी. "

" कशाला रे ही पूजा ? त्या जनावरांना त्यांत कांही कळतें

तरी ? अशिक्षितांचे हे खेळ आणि ह्या समजुती. आम्हांला यांत विश्वास नाही. पूजा बीजा काय करायची ? तूं आमच्याकडे आलास. तुला आम्ही ओळखतों. हा घे तुझा इनाम..." असें म्हणून पोटीं खोचलेला एक रुपयाचा कागदाचा चिटोरा तिनें पैकूच्या हातांवर ठेविला आणि "डॉक्टर घरीं नाहीत" असें सांगून ती आंत गेली.

पैकूने इतके दिवस आनंदाने साजरा केलेला हा सण ! या बाई अन्न खातात की कडू औषधेंच पिऊन रहातात याबद्दल अचंबा करीत पैकू तेथून निघाला. घरीं येतां येतां रात्रीं अकराचा सुमार झाला. अंगणांत तेलबातीच्या जवळच त्याने बैल बांधले. थकलेला मुलगा नव्या कपड्यानिशींच आपल्या वाकळीवर जाऊन झोपला. पैकूने बैलांच्या अंगावर तांदूळ टाकले. आपले नवे कपडे काढून ठेवले आणि लोटाभर पाणी पिऊन त्याने आपली पथारी जवळ केली.

बायजा १५-१६ तासांच्या श्रमांनी दमून मुलाला पोटाशीं घेऊन आडवी झाली होती.

मूल घोरूं लागलें. पैकूने दिवा विझविला आणि बायजेच्या अंथरुणावर जाऊन त्याने तिला जोराने गदगदा हलविली. त्याला माहित होतें तिला झोप लागली नाही, तिने झोपेचें सोंग केलें म्हणून !

" बजे, आज इतक्या लवकर झोपायला या चोवीस घंट्यांत म्हातारी झालीस होय ? "

" कां ? खुशींत दिसतायसा ? खूप कमाई करून आणलेली दिसते. आल्यावर बोलायलाहि वेळ झाला नाही ! झोपा आपले जाऊन. नाहीतर उगीच कालच्यासारखें तुमचें मन आपलें काळें

बिळें होऊन येईल !"

" बरें, बरें ! फार बोलतेस आज ? चल ये इकडे. "

" किती कमाई आणली आज ? काय दिलें कुणी कुणी ? "

पैकूने सगळें सांगितलें. कुणी काय दिलें याचा हिशेब केला.

" आणि हें पहा..."

" काय ? "

" डॉक्टर माहित आहे तुला ? "

" तो औषधवालाच की नाही ? "

" होय. त्याच्या घरीं जोडी नेली होती पूजेला. "

" बैलांच्या गळ्यांतली ती लाल माळ तिथलीच ना ? "

" नाही ग ! बयेने पूजाच केली नाही लाल्या-ढवळ्याची. "

" म्हणजे ? "

" म्हणाली, तीं जनावरं. त्यांची काय पूजा करावयाची ? आम्ही तुला ओळखतों. "

" मग तुम्ही निघून नाही आलांत ? "

" होय. तिने एक रुपयाचा कागद दिलाय्. "

" बैलांची पूजा केली नाही आणि चिटोरें दिलें ? "

" म्हणे, आम्ही शिकलेले आहोंत,"

" पण खाते बैलांच्याच पायाचें ना ? " दोघेहि कांही वेळ चूप राहिले !

" पैकू..." बायजेने अगदी एकेरी नांवाने सलगीच्या, मन-सुभ्याच्या स्वरांत निश्चयपूर्वक उद्गार काढला.

"कां ग बजे ?" पैकूने तिच्या दंडावर हात ठेवला.

"लाल्या-ढवळ्या आज आपल्या घरचे पाव्हणे. तीं कांहीं आज जनावरें नव्हत. त्या बाईने अपमान केला त्यांचा. हें गोडपण नव्हे. कुठाय तो कागद ? तो जहर आहे आपल्याला. त्याचा पैसा होणार नाही कधी !"

पैकू उठला. आगणांतील तेलवात त्याने आणली. अंगडयां-तला तो कागद काढला आणि बागजेच्या स्वाधीन केला.

"आमचे पाव्हणे. त्यांना सगळें समजतें. ते आम्हांला सर्व देतात. हा कागद कडू आहे!" तिने तो संबंध एक रुपयाचा–सोळा आणे किंमतीचा–कागद सरळ त्या तेलवातीवर धरला आणि नंतर तेलवात अंगणांत नेऊन ठेवली.

सदऱ्यांत शिरलेला ढेंकूण पकडून काढून टाकल्यावर गार वाऱ्याच्या झुळकीने जशी मुसावून झोप लागावी...!

झोपतां झोपतां बायजेने पैकूच्या कपाळावर हात ठेवला व विश्वस्त स्वरांत म्हणाली,

"पैकू ! आज 'मारबत*' नाहीं ओरडलास ? 'कर*' सुरू

* आमच्या प्रांतांत पोळ्याच्या दुसऱ्या दिवसाला म्हणजे श्रावण महि-न्यांतील अमावास्येच्या दुसऱ्या दिवसाला 'कर' म्हणतात. तो सबंध दिवस लोक खेळण्यांत, आनंदांत घालवितात. आमचे आजोबा या दिवशी कधी नाही ते धर्मकर्म म्हणून जुगार खेळीत असत.

[ पुढील पानावर चालू ]

झाली असेल. ओरड. मग आपण झोपूं.

पैकूने उठून बसत उच्चारलें.

"माशामुरकुट्या, खरूजखोकला, मानअपमान घेऊन जारे मारबत—!"

वर्धा, ६–९–४५

[ मागील पानावरून पुढे चालू ]

वाईट गोष्टींचें, रोगराईचें प्रतीक म्हणून एक देवता कल्पितात किंवा तयार करतात व तिची मिरवणूक काढून विसर्जन करतात. हाहि एक विधीच समजला जातो. आणि कर सुरू लागते त्या रात्रीपासून माणसे जागली करून सारखी ओरडतात—" माशामुरकुटे, डासचिलटे, खरूज-खोकला, इडापिडा, घेऊन जाऽऽरे मारबत " त्या दिवसानंतर माशा, डास, रोगराई कमी होते या विश्वासाने मग दुसऱ्या दिवसापासून नित्य-कर्में सुरू होतात.

## ७ स्नेहदीप

बाबांचें मत उत्तरोत्तर माझ्याविषयीं कलुषित होत गेलें. त्यांची समजूत अशी की मी आता वयांत आलों आहें तेव्हा त्यांच्या अंगावर खाऊं नये. आपलें वेगळें पहावें. आईसुद्धा बाबांना वारंवार तसेंच सांगत होती.

आणि तें स्वाभाविक होतें. माझी आई वारली त्याच वेळेला माझें मायेचें असें कुणी राहिलें नाही. बाबांचें अंतःकरण पुरुषी आणि पुन्हा ही नवी आई.

मनुष्य मोठ्या आवडीने बागेंत झाड लावतो. वाऱ्याच्या लहरींनी तें झाड हालत डुलत झोके घेतें. दवाचे थेंब त्यावर पडले म्हणजे ते मोत्यासारखे पानांपानांवर थबकून रहातात. झाड उत्तरोत्तर मोठें होत जातें. त्याला कळी येते. फूल फुलतें. माणसाला वाटतें, आपल्या श्रमाचें सार्थक झालें.

नंतर सहज एक टोळधाड येते आणि फुलांचा व झाडांचा सत्यानाश करून जाते. मशागत करणाऱ्या जीवाला वाईट वाटतें. तो हताश होतो. तथापि जगायचें तोंवर त्याला आराम हवा असतो. विसावा, सुख हीं त्याला शोधावीं लागतात.

मिळालें तर तेवढेंच सुन्दर झाड पुनः बागेंत लावावयाची त्याची तयारी असते. तो तसें करतो. पुनः त्याच्या आयुष्यांत वसंताचा मोहर बहरतो.

पण एक मात्र खास. अेकदा टोळधाड आली तशी पुनः येऊं नये आणि आल्यास आपलें सर्वस्व तिला हिरावितां येऊं नये याबद्दल तो फार जागरूक असतो. सबब या झाडाची तो मागच्या पेक्षा ज्यास्त आणि विशेष काळजी घेतो.

बाबांची तशीच स्थिति झाली. त्यांचें ठीक होतें सारें. पण माझी स्थिति ?

त्या वेळीं मी सोळा वर्षांचा होतों व आता विसाच्या घरांत आलों होतों. पण हा फरक माझ्या आईला तितकासा जाणवला नसता. फरक जाणवण्यासारखी स्थिति निर्माण झाल्यामुळेच जितक्या लवकर मी स्वतंत्र होईन तितक्या लवकर मला हवें होतें. आणि खरें सांगतों मला परमेश्वराने सर्व दिलें होतें. सुंदर रूप होतें, उंच पुरा बांधा होता. मनगटांत जोर होता. डोक्यांत मेंदू होता. अंगांत रक्त होतें. त्यामुळे आत्मविश्वासहि भरपूर वाटे. असे वाटे की लाथ मारीन तिथे पाणी काढीन.

तथापि भोवतालची परिस्थिति तशी नव्हती. लाथ मारायला जावें तों ती जमिनीवर जोराने आदळावयाची आणि जमिनींतून निघण्याऐवजी डोळ्यांतून पाणी निघायचें.

कसेंहि असलें तरी–घरांतून–त्या वणव्यांतून बाहेर पडल्या-वाचून गत्यंतर नव्हतें.

असेंच माझ्या मनाने एक दिवस घेतलें. जी पहिली गाडी मिळाली तिच्यांतून माझा प्रवास सुरू झाला. एक नाही हजार तऱ्हेचे विचार मनांत थैमान घालीत होते. अशाच एका स्टेशनमध्ये गाडी शिरली. तिथवरच माझ्याजवळ तिकिट होतें. पण मी उतरलों नाही. गाडी प्रत्येक स्टेशनवर थांबत असे, कांही लोक उतरत, कांही लोक पुन्हा बसत; कांहींचा प्रवास संपत असे. कांहीचा सुरू होई. माझ्या प्रवासाला मात्र खरी सुरुवात झाली होती.

असंख्य स्टेशनांनी माझ्या प्रवासाला खंड पडत होता. त्यांपैकीं एका स्टेशनवर गाडी थांबली. मी खिडकींतून बाहेर पाहिलें. चहा मागविला व सहज डब्याखाली अुतरलों. तोंच—कांहीशी गोंधळूनच मी हाक मारली:— "शर्माजी—"

त्यांनी माझ्याकडे पाहिलें. मी सामान घेअून खाली उतरलों.

"ओहो, हेमंत, किती दिवसांनी भेट? या पांच वर्षात अगदी पत्ता नव्हता तुम्हां मंडळीचा. बरें तुझें सामान हेंच ना?"

त्यांनी एका पोर्टरला हाक मारली आणि माझें सामान त्याच्या हवालीं करून 'इन्हें घर ले जावो' असें म्हणत ते माझ्याकडे वळले—

"मी अेवढी गाडी सोडून आलोंच, तूं चल तोंवर घरीं." जवळ येऊन उभा राहिलेल्या गार्डाशीं ते बोलूं लागले. मी पोर्टरच्या मागून निघालों.

शर्माजी या लाईनवर आहेत हें जर मला माहित असतें तर मी आरंभींच इथे उतरावयाचें ठरविलें असतें.

घरांत पाऊल घालतांच सरलादेवी मला पाठमोरी टेबलाजवळ उभी असलेली दिसली. मीं एकदम हाक मारली, तिने चमकून मागे पाहिलें.

" ओहो तूं ? " आणि टेबलावर आपल्या मुलाकडे पहात ती हसून माझ्याकडे व्यंग करीत करीत म्हणालीः—

"रतन, पहा रे बाबा जरा, सूर्य आज कुणीकडे उगवला तो!" तिने माझ्यासमोर खुर्ची केली.

पांच वर्षांपूर्वी देवी जशी प्रेमळ व विनोदी होती तशीच ती आज पण दिसली. त्या वेळीं रतन झाला नव्हता. आमच्या गावावरून बदली झाली तेव्हा किती हट्ट घेतला होता तिने माझ्याबद्दल ? शेवटीं आईने शपथ घेऊन सांगितलें होतें. "चार पांच महिन्यांत सरल, तुझें सारें ठीक जमल्यावर मी जरूर येईन. आणि मग हेमला ठेऊन जाईन."

आई मला टेऊन गेली एवढें मात्र खरें!

" हेम, हें आईचें चार महिन्यांनी येणें असेल नाही ? एका पत्राने तर चौकशी करावयाची होती माझी ? " तिच्या प्रश्नांत खोच असली तरी ती स्नेहाने भरलेली आणि माझ्या येण्याच्या आनंदाने अगदी ओथंब झालेली अशी होती.

पण माझें तोंड काळें ठिक्कर पडलेलें तिला दिसलें असावें. माझ्या तोंडून कसें बसें वाक्य फुटलें, "मला वाटलें होतें की, बाबांकडून तुम्हांला कळलें असावें. सरलादेवी, आई गेली–" आणि मी गप्प बसलों.

ती माझ्याजवळ आली. एव्हाना शर्माजी पण येऊन पोचले होते. ते मुकाट्याने माझ्याजवळ येऊन बसले.

स्त्रीचें अंतःकरण! माझ्या पाठीवरून तिचा हात फिरत होता. दुसऱ्या हाताने ती रतनला संभाळीत होती. सर्वच अनपेक्षित पाहून तो गोंधळून रडूं लागला होता.

" तुमची बदली झाल्याच्या चार महिन्यांनी आईने रस्ता सुधारला आणि तेव्हापासून—" तेव्हापासूनची सारी हकीगत मी थोडक्यांत सांगून टाकली.

आठ दहा दिवस माझा मुक्काम तिथेच होता. मधूनमधून वाटे, किती दिवस इथे रहाणार ? पण जायचें कोणत्या निमित्ताने हा प्रश्नच होता. तिथे मला शीतल चंद्रिका लाभली होती. चार वर्षांची तहान मी तृप्त करून घेत होतों.

तरी देखील फार दिवस राहणें प्रशस्त वाटेना.

" देवी, मी उद्या जाईन म्हणतों. "

एक दिवस आम्ही माजघरांत बसलों असतांना मी गोष्ट काढली.

" कुठे ? "

" कुठे म्हणजे ? " मी विचारलें.

" कुठे म्हणजे कुठे, कुठे बाबांकडे जाणार ? "

एकादी जखम दुखत असतांना त्या दुखण्याचा त्रास कांही दिवसांनी जाणवत नाही माणसाला. असेंच माझें झाल्याने मी शांतपणें उत्तर दिलें—

" आता कशाला जायचें बाबांकडे ? घातल्या पावसाने कधी पीक आलें आहे का ? मी जाईन म्हणतों येथून, एवढेंच सध्या पक्कें आहे. मेल्या मढयाला जागा मिळते. मग माझ्यासारखा कांहीच का करूं शकणार नाही ? कुठे तरी जावें, दोन पैसे हक्काने मिळवावेत. अुन्हांत काम करावें आणि विसाव्यासाठी सावलींत यावें."

तिने माझ्याकडे एकवार पूर्ण दृष्टि टाकून सहानुभूतीने माझ्या देहाला जणुं आपल्या दृष्टीने कुरवाळिलें. माझा चेहरा अगदी म्लान झाला होता. तिच्या सरल, स्नेहार्द्र दृष्टीशी मला दृष्टी देतां आली नाही. ती शांतपणाने म्हणाली—

" मी जेव्हा तुमच्या तिथून इथे आल्ये तेव्हा तुझ्या आईने मला पोटाशीं धरून वचन दिलें होतें की, सरला, हेमला मी तुझ्या स्वाधीन करीन. तो तुझा — तुझा मुलगा मान त्याला. राधाकाकी गेली हें खरें. मला माझी आई गेली त्या वेळीं हि इतकें भकास वाटलें नाही. काय संबंध असतात. पण कसें का असेना तूं सुखरूप मला मिळालास. हेम, माझ्या तारुण्याच्या उमेदींत मी आठ वर्षें तुझ्यावर जीव लावला. अपत्यनिर्विशेष तुला संभाळलें. रतनहि माझा—माझ्या मनाला तुझ्याइतका जवळचा वाटत नाही. इतके ते दिवस माझ्या मनावर ठसले आहेत आणि आता तर देवानेच तुला माझ्या स्वाधीन केलें आहे. मला दोन मुलें जड नाहीत हेम ! तूं जाण्याचा संकोच का करतोस ? आम्हांला तूं इथे परका नाहीस. तुला का असें वाटावें ? "

देवाने मला माझ्या विपन्न अवस्थेंतहि हिच्या स्वाधीन केलें

याची हिला धन्यता वाटावी आणि बाबांना ? जशी माझी नवी आई मला तितकीच किंवा त्याहूनहि दूरच असलेली सरलादेवी. केवळ शेजारसंबंध एवढेच !

सरलादेवीचे बोल मोठे निववणारे असे होते. मला किती शांत वाटलें. त्या रात्रीं मला किती सुखाचीं अनंत स्वप्नें पडलीं आणि कित्येक दिवसाचा शीण गेल्यासारखा वाटला.

अखेर एक दिवस शपथेवर परत येण्याचें कबूल करून मीं शर्माजींचें पत्र घेतलें व आग्रा शहर जवळ केलें. पत्राने माझें काम झालें. मला एक बऱ्यापैकी नोकरी लागली. मला माझी हक्काची भाकर मिळूं लागली. पण मनाची तृष्णा ? मीं बाबांना पत्र घातलें. त्यांनी मला काढून दिलें असलें तरी मला ते दूरचे नव्हतेच. त्यांचा राग शांत होण्यापुरतें मला आपल्या पायावर उभें राहतां आलें होतें. मला आईची आणि सरलादेवीची फार आठवण येई आणि माझें एकाकी जीवन अधिकच खायला धावें. मी नियमितपणे शर्माजी आणि सरलादेवी यांना पत्रें घालीत असें आणि त्यांचीं उलट डाकेने पत्रें येत.

बाबांचीं पत्रें इतकीं नियमीत नसत, पण त्यांना माझी आठवण येत असेल असें मला उगीचच वाटे.

असा क्रम वर्षभर चालला. मध्यंतरीं दुर्गापूजेच्या वेळीं आणि आणखी एकदोनदा मी सरलादेवींना भेटून आलों होतों. सर्व टीक चाललें होतें.

पण उगीचच मला कालपासून रुखरुख लागून गेली होती. शर्माजींकडून माझ्या दोन्ही पत्रांचीं उत्तरें नव्हतीं. देवीचेंहि मागचें

पत्र अनुत्तरित होतें. बाबांचें एक पत्र पंधरा दिवसांपूर्वी आलें होतें. त्याचा मथितार्थ एवढाच की त्यांना आराम नव्हता.

अगदी धीर निघेना म्हणून चार दिवस रजा मागून मी सरला-देवीकडे जायला निघालों. दोन दिवस राहून एकदा बाबांकडेहि चक्कर मारण्याचा इरादा होता.

त्या दिवशीं गाडीहि भलतीच हळू चालत होती. विचारहि बेफाट बेछूट येत. स्टेशन येतांच मी घाईने ऑफिसांत शर्माजींकडे गेलों. ते स्टेशनचें काम करीत होते. मला पहातांच त्यांनी मान खाली घातली.

" हेम, घरीं जा," एवढेंच म्हणून ते उतारूंची तिकिटें घ्यावयास बाहेर आले.

मी तडक जावयास निघालों. दारांत पाऊल घातलें. मोलकरीण खसाखसा भांडीं घासत होती. एंजिन आगगाडीपासून सुटून पाणी घ्यायला तेवढयांतच भक्भक् करीत निघालें होतें. रतन कापराच्या भावलीशी खेळत होता. मी त्याला वर उचललें. तो मला बिलगला.

मधल्या घरांत कसलीशी घाण येत होती. रतन त्या बाजूला बोट दाखवीत होता. मी तिकडे जाऊं लागणार तोंच—

मोलकरीण जवळ आली. तिने खुलासा केला. आठ दिवसांपूर्वी देवी अपुऱ्या दिवसांची बाळंत झाली. इथे डॉक्टर चांगलासा मिळाला नाही. बाळ जिवंत निघालें नाही. रक्तस्राव खूप झाला आणि देवी........!

मी खालींच बसलो. मस्तक भणभणूं लागलें. रतन रडूं लागला. माझे अश्रु सुकले.

जिच्या भरवशावर माझी जन्मदात्री विसरण्याचा मी प्रयत्न करत होतो, तीहि राहिली नाही. या निधनाने मला माझ्या अंतरीं खोल डोकावण्याची संधि मिळाली.

माझ्या मनांत असा विचार आला की शरीरशास्त्रदृष्टया जें अंतःकरण सरलादेवीजवळ होतें तसेंच अंतःकरण माझ्या सध्याच्या आईलाहि देवाने दिलें असेलच. मग मी माझ्या घरच्या ज्योतीची वात सारण्याचा प्रयत्न का करूं नये ? आजवर तसा प्रयत्न माझ्याकडून नको होता का व्हायला ? माझ्या स्नेहाने माझ्या या आईच्या हृदयींच्या रत्नदीप प्रकाशणार नाही का ?

आणि काय असेल तें असो पण तो विचार माझ्या मनांत असा फोफावला, की मी दोन दिवसांनी रतनला घेऊन बाबांकडेच जायला निघालों. रतनचें तोंड चिमणीसारखें इवलेसें होऊन गेलें होतें. त्याचें गोंडस मुखकमल कोमेजलें होतें.

किती दिवसांनी मी माझें घर पहात होतों. मला माझ्या आईची एकदम तीव्रतेने आठवण झाली. मी दारांत पाऊल टाकतांच बाबा बसलेले दिसले. जाऊन मी त्यांना नमस्कार केला. त्यांनी मला घट्ट छातीशीं धरलें.

बागेंतील नवीन झाड दिसत नव्हतें.

इथेहि आणखी काय वाढून ठेवलें आहे ?

बाबांनी प्रत्यक्ष सांगायलाच हवें होतें असें नाही. सर्व माहिती कळण्यासारखी होती.

त्या झाडाचा दुसऱ्या बागेंत मूळ धरण्याचा प्रयत्न चालला होता. आणि तेथे पांढऱ्या कुंपणाने त्याचें रक्षण केलें जात होतें.

माझ्या हृदयींचा सोसाटा आता माझा मलाच आवरेनासा झाला. अनेक भावनांचे कल्लोळ माझ्या डोक्यांत माजले. मला कांही समजेनाच.

जो विचार मी घेऊन आलों होतों तोहि सदोषच होता का ? ही दुसरी आई दूरची ? मग मला जवळचें कोण ? ज्याच्या अंतःकरणांत मला माझी आई दिसेल आणि माझ्या अंतरींच्या स्नेहाने मला तेथले दीप उजळतां येतील असें कोण ?

बाबांच्या आलिंगनांतून सुटून मी आजूबाजूला पाहिलें. पडवींतच भिंतीवर माझा आणि माझ्या आईचा असे दोन मोठे फोटो टांगलेले मला दिसले.

सुखें गोलगोल फिरतात की आपण, कुणास ठाऊक ! पण आमची एक प्रदक्षिणा झाली होती व आमचे आम्ही पुनः एकदा आम्हांला सापडलों होतों.

वर्धा, २८–८–४५

# ८ पाणथळ

दिवसांतून दोन वेळ भरपूर पाणी मिळणारी फुलबाग फुलांनी बहरते, फळांनी लवते, आजूबाजूचे पहाडपर्वत वाऱ्याच्या हातांनी तिला आशीर्वाद देतात. तिच्या कल्याणमय चिरजीवनाची इच्छा करितात.

—आणि जमिनीच्या पोटांतून जाळ फुटतो. हादरा बसतो. सर्व अग्नये स्वाहा होऊन जातें. हाहाकार माजतो. जिथे जें असतें तें जातें. जें नसतें तें येतें. नवें प्रकट होतें.

जीवन-यात्रेच्या एका विपरीत क्षणीं सातपुड्याच्या एका सघन राईंत चिंचोळ्या नदीच्या खडकावर बसून दिवस घालवि-ण्याचा प्रसंग आला. त्या वेळीं समोरच्या कपारींत एक वहीसारखें कागदाचें पुडकें सापडलें. तिच्यांतले बरेच कागद फाडले गेले होते. कांही पानांवर काय लिहिलें होतें हें समजणें दुरापास्त होतें. कारण त्यांत संकेत लिपि वापरली होती. कांही पानें सुसंगत मजकुराने भरलीं होतीं. अमेरिकेचा शोध लागेना, किती दूर जायचें याचाहि अंदाज होईना. मृत्यू समोर येऊन थयथय नाचूं लागला. त्या वेळीं तत्काळपर्यंतच्या हकीगतीचें टांचण मेणानें चोपडून बंद पिंपांत

घालून कोलंबसाने समुद्रांत सोडलें होतें. हेतु हा की, जगाला आपली खबर कळावी.

तथापि प्रस्तुतच्या वहींत असा कांही हेतु नव्हता. हा अज्ञात जीव या नदीकाठीं कधी तरी येऊन ओंजळभर पाणी पिऊन गेला असावा येवढेंच काय तें त्यावरून कळावयाचें. अशीं हीं टांचणें, त्यांतील तारखांवरून फारसा अंदाज होत नाही. सबब आवश्यक जुळणी करून त्यांतील खालील मजकूरच तेवढा मिळालाः—

* * * —

ता०—१

" आजपासून चार दिवसांनी मी अशा ठिकाणीं जाणार की तेथून कधी परत येणें नाही. माझ्या नांवाची चिठी पडली आहे. ती कधी तरी अशीच माझ्या नांवाने अवचित पडणार असें मी माझ्या मनाला कधीपासूनचें बजावून ठेवल्यामुळे मला त्याबद्दल कांही वाटत नाही हें खरें आहे. चिठींत माझें नांव येतांच अगदी सहजगत्या मीं माझ्या तळहाताचें रक्त काढलें व त्या कागदावर सही केली.

" सर्व पाश तोडले मी. कसलाहि मोह नाही मला असें किती विश्वासाने मला वाटायचें. पण ही वसुंधरेची आठवण ! परिचय झाला तेव्हा या तरुण मुलीला घरकाम करतांना, अन्नपूर्णे- सारखें आम्हां क्षुधार्त मंडळींना वाढून तृप्त करतांना पाहिलें होतें. आज ती माझ्याकरितां आत्मार्पण करायला तयार आहे.

" एका गावीं माझें विशिष्ट काम असे. तिथे ठराविक घरीं ओळखीने उतरावें लागे. ते गृहस्थ प्रसंगवशात् माझ्या वडिलांचे स्नेही निघाले. तिथेच त्यांची वसुंधरा आमची पंगत वाढायला आली असतांना दिसली. इतर कामें करूनहि तिला हें काम करावें लागल्याने थकून तिचें मुख घामाने डबडबलें होतें. तिचा चेहरा त्या वेळीं मला अतिशय आकर्षक वाटला. आणि स्त्रियांकडे फारसें बारीक लक्ष देण्याची सवय मला नसतांहि तिने मला जें जें वाढलें तें मी भराभर संपविलें होतें.

" आठ दिवसांनी मी त्या गावावरून निघून गेलों. ही त्या गावाची माझी पहिलीच खेप होती.

* * * —

" आयुष्यांत एकदाच ताजमहाल पहावा व जन्मभर आठ-वर्णींचे शिंपले मोत्यांनी भरून ठेवावेत. आणि वसुंधरेला त्या माझ्या मुक्कामांत मीं कित्येकदा बघितली होती.

" मला तेथे काम फार असे. गावाची वस्ती बारा हजार. वेगवेगळ्या लोकांशीं वेगवेगळ्या रीतीने वागावें लागे. ज्याच्या त्याच्या लायकीप्रमाणे कामें निवडून द्यावीं लागत. शिवाय आपल्या वेगवेगळ्या भूमिका. सध्याच्या परकीय सरकारने नेमलेल्या जिल्हा-धिकाऱ्याला जिल्हा संभाळतांना जेवढे श्रम पडत नाहीत त्यापेक्षा शंभरपट जास्त खस्ता, त्रास ! त्यामुळे मला माझा वेळ पुरत नसे. रात्रीं पुनः सर्व हकीगतीचीं टाचणें करून केंद्राकडे पाठवावयाचीं !

" पण या सर्व घाई–गर्दीत जेव्हा कधी वसुंधरेच्या स्मृतीची फुलबाग दिसे तेव्हा वाटायचें, थोडा विसावा घ्यावा. येवढ्या माळा गुंफून टाकाव्यात. माझ्या मनाचा संभर वाढे. त्यांत मोहाचा भाग किती होता याची त्या वेळीं कल्पना येत नसे. "

* * * —

" माझें राजकीय काम. पुनः सर्वसंमत नसलेलें. आमचा मार्गच काट्यावरून. ती सुळावरची पोळी. आमच्या दुःखाबद्दल कुणाला सहानुभूति नसावयाची. सुखाचे, श्रेयाचे वांटेकरी मात्र सर्वच होऊं इच्छितात. एकाद्या हिंस्र श्वापदाकडे लोक ज्या दृष्टीने पाहतात त्याच दृष्टीने आमच्याकडे त्यांचें बघणें.

" त्यांची कल्पना अशी की, आम्हांला काळीज नसतें. त्यांना वाटतें की आमच्या कोमल भावना मरून गेल्या आहेत.

" त्यांचा समज असा की, जे सात्त्विक आणि शुद्ध असतें तें आम्हांला वर्ज्य असतें.

" त्यांचें म्हणणें खरें आहे. कारण त्यांना आमचें फक्त बाह्य शरीर दिसतें. मन, हृदय दिसण्याचें किंवा दाखविण्याचें यंत्र अझून निघालें नाहीं. आणि ज्या रीतीने लोकांना आपलीं हृदयें दाखवितां येतात ती रीति आम्हांला परवडत नाही.

" वास्तविक आमची स्थिति अशी असते की, स्वतःच्या कोमल, शुद्ध, सात्त्विक भावना अंतःकरणाच्या कोपऱ्यांत ठेवून द्यावयाच्या. त्यावर द्यावयाचे पक्कें बसवून कर्तव्याचें झाकण !

" असें घट्ट बसवायचें की, आमचीं नित्यकर्मे करीत असतांना आंतली आरडाओरड ऐकूं येतां कामा नये. घराबाहेर पडतांना आम्हांला आमच्या घरावर निखारा ठेवावा लागतो. त्यामुळे लोक म्हणतात आम्ही आततायी आहोंत.

" सूर्याजीने दोर कापण्याचें तत्त्वज्ञान मावळ्यांना शिकविलें होतें.

" कमी अवधींत जास्त आणि पुष्कळांच्या वाट्याचीं कामें आम्हांला करावीं लागतात म्हणून तेंच तत्त्वज्ञान आम्हांला परंवडतें.

* * * —

" वसुंधरा मला हवीशी वाटे आणि तिच्या सान्निध्यांत आयुष्याची दिवाळी भोगण्याचा मोह कधी कधी मनाला अभिभूत करी; पण मग कर्तव्याचें काय ? प्रेमाच्या सान्निध्यांत कर्तव्याचे काटे खुपत नाहीत, कर्तव्य त्यामुळे सुकर होतें असें म्हणतात. असा प्रत्यय येणाऱ्यांना माझे शतशः प्रणाम. त्यांनी आपलें जीवन सार्थकीं लावलें.

" पण हा प्रयोग एकदाच करावयाचा असतो आणि तो फसला तर ?— "

* * * —

घरीं फुलांची शेज तयार असतांना मला कुणी काट्यागोट्यांतून चालूं देईल ? छे, छे, असें करणें युक्त नव्हतेंच—"

" ह्या सर्व एकतर्फी गोष्टी आहेत अशी माझी कल्पना. वसुंधरा या बाबतींत अश्राप आहे. अपराध माझाच. माझ्याच मनाचे हे सर्व खेळ ! ते विसरण्यांतच माझें आणि इतरांचें कल्याण.

" विसरलेंच पाहिजे, हा निश्चय जेव्हा केला तेव्हा मनाला एक मोटें काम केल्याइतकें समाधान लाभलें.

" माझा प्रयत्न सफलहि झाला. मी सर्व विसरलों. शिवाय आमच्या कामाचा सीझन सुरू झाला होता. त्यावेळीं क्षणाची उसंत नव्हती. वसुंधरेच्या गावाचेंच काम गाडाभर पडलें होतें. वेळीं अवेळीं जेवायला वाढणारी वसुंधरा प्रेमाने वाढते की कसें, तें अन्न गोड आहे की कडू याचीहि मला शुद्ध नसे.

" आणि नवीन मिळालेल्या दीड लाख रुपयांची विल्हेवाट लावण्याचा तो आठवडा. वसुंधरेच्या मुखाकडे नजर उचलून पाहण्याचेंहि भान त्यावेळीं नव्हतें मला. समोरची भिंत, जवळचें टेबल, हातालगतचा दिवा, खिशांतलें पेन, तशी वसुंधरा—

" मला माझीच स्तुति करावीशी वाटली. मला संयमाचा, कार्यपरतेचा उन्माद चढायची वेळ आली होती. "

* * * —

" हें असेंच चालूं शकलें असतें. पण तें वसुंधरेने मैत्रिणीला लिहिलेलें पत्र ! दुसऱ्यांचीं पत्रें दृष्टीला वर्ज्य समजावीत. नकळत चुका झाल्या तरी फळ भोगणें येतेंच. दशरथाने जाणतेपणीं श्रावणाला बाण मारला नव्हता. पण ' हाय राम ! हाय राम !' करीत त्याने जीवित त्यागिलें.

" स्त्रीची नजर सूक्ष्म असते हें खरें. एरवी—' ज्यांच्या ज्यांच्यांत ईश्वराने प्राण ठेवला आहे त्यांना सकाळीं हुरूप येतो आणि सायंकाळीं विसाव्याला ते आसावतात. पण यांच्या जीवनांत इतके दिवसांच्या परिचयानंतरहि असली सायंकाळ असल्याचें आढळलें नाही मला. त्यांचा कोरा करकरीत चेहरा. ना त्यावर दवाची कलारेखा की जीवाचें दुःख! तथापि मी स्त्री असल्याने येवढें मात्र नक्की सांगूं शकत्यें की त्यांचें हृदय कितीहि अथांग असलें तरी मी त्यांच्यापासून दूर नाही......' हीं वाक्यें तिने पत्रांत कशीं लिहिलीं असतीं ?

"तिचें पत्र माझ्या हातांत आहे हें पहातांच तिने माझ्या डोळ्याला डोळा दिला नाही आणि तिने पाहिलें असतें तरी मला नजर उचलतां आली असती किंवा नाही याबद्दल मला संशयच आहे.

"माझ्या मनाच्या कोपऱ्यांतलें, पक्कें झाकण घालून कडी कुलपांत बंद करून ठेवलेले माझे विचार तिला कळले ही जाणीव तर माझ्या जीवाचा थरकाप करून टाकूं लागली.

"मीं ते विचार येऊं दिले, त्यांची जपणूक केली हीच चूक. मौल्यवान वस्तूच माणूस कडीकुलपांत ठेवतो ना ? माझी तोंवर कल्पना अशी की हे विचार माझेच एकट्याचे ! इतरांना त्यापासून कसला उपद्रव !"

"पण बुरुज फोडून बारुदीचा गोळा आंत गेला होता. आता काय करावें ?

"माझ्या मनांत हळुंहळुं प्रकाश पडूं लागला. त्या गावाचें काम मीं अंगावर घेऊनच पार पडलें असतें असें नाही. इतकें नियमित जाऊन केलें नसतें तरी चालूं शकत होतें. आणि तें काम व्हावें या कटाक्षानेच केवळ माझें येणें निर्भेळपणें होत होतें असेंहि आज वाटत नाही.

"मौज अशी की जें मी वसुंधरेजवळून लपवूं इच्छित होतों तेंच माझ्याजवळून लपविण्याचा तिचा प्रयत्न होता."

* * * —

"दोन दिवसांनी वसुंधरेशीं बोलण्याइतकी माझ्या मनाची घडी मीं घातली. तिला परिस्थितीचें चित्र अत्यंत भेसूर करून दाखविलें. परोपरीने ठसविलें तिच्या मनावर की तुझ्या आयुष्याचें मातेरें मी करूं धजणें शक्य नाही.

"पण हें सर्व बोलतानाहि मला तिच्या सन्निध्यांत वाळवंटातील वाटसरूची आठवण होई. पाणथळी आला म्हणजे त्याला असाच आनंद होत असेल, अर्धा मुक्काम जवळ केल्यासारखें वाटत असेल. तथापि मनांत हें सर्व चालूं असतांना मी तिला समजावीत होतों, 'यांत कल्याण नाही.'"

* * * —

"या माझ्या देशांत अशा स्त्रिया आहेत की ज्यांनी धैर्यवंतांनाहि धीर दिला. मनोदुर्बळाला सबळ केलें! वसुंधरा बराच वेळ बोलली नाही. ती तशीच माझ्यासमोर धरणीवर मोतीं पसरीत उभी होती. जरा वेळाने सावर धरून बोलली, ती मात्र

विजेसारखी तेजस्वी, अमृतासारखी संजीवक अशी—'तें पत्र हा माझ्या मनाचा चोरकप्पा होता. त्यातलें तुम्हांला कांही कळावें किंवा कळेल याची मला कल्पना नव्हती. माझ्याने होईल तो प्रयत्न मीं तुम्हांला मदत करण्याचाच केला. उलट मला तुमचीच भीति होती की माझ्यामुळे तुमच्याच हातांतलें धनुष्य गळेल आणि तुम्ही रथाखाली उतराल. कितपत साधलें मला माहीत नाही, पण मीं तें टळावें असेंच वर्तन केलें. तुमच्यासमोर मीं कधी संभ्रम दाखविला नाही विभ्रम तर नाहीच नाही. फुलांचा हव्यास मीं धरला नाही आणि प्रसंग पडल्यास मीं तुम्हांला हेंहि सांगावयाची माझ्या मनाची तयारी करुन ठेवली होती की माझ्यापेक्षा तुमची कटयार, तुमचें पिस्तुल जास्त तेजस्वी आहे, सुंदर आहे. त्यांची उपासना तुम्ही अंगिकारिली आहे. ती निष्ठा कमी होऊं द्याल तर पापाचे धनी व्हाल''तुमची सिद्धि भंगेल! पण आता झालें तें असें! झालें तें विपरीत! योगायोगाने! पण याला मीं उपाय योजिला आहे. द्या; एकदा तुमच्या चरणांवर डोकें ठेवतें आणि तुमच्या कार्यात यश चिंतितें. असलें शुभचिंतन जगांतल्या फार थोडया स्त्रियानी केलें आहे. त्यांच्यांत मला माझें नांव नोंदविण्याची संधि मिळाली याचा मला अभिमान आहे. तुमचें शुभ इच्छिण्याचा, आशीर्वचन देण्याचा माझा हक्क मीं कोणत्याहि रीतीने डागळूं दिला नाही......'

"हें स्त्रीचें मन! परमाणूपेक्षाहि सूक्ष्म व तितकेंच शक्तिशाली! माझ्या उद्दिष्टापेक्षाहि मोटी क्रांति मला पहावयाला मिळाली!

" आणि म्हणूनच त्या स्मृतीची उदात्तता, पवित्रता, मंगलमय कमनीयता, आजच्या शेवटच्या कल्याणघडीला स्मरण्याची तिची पात्रता......

" माझा निर्णय घेणें मला त्यामुळे किती सुलभ झालें, स्मृतिसुमनें–त्यांची माला, अश्रुफुलें–त्यांची पखरण, औदासिन्य त्याचें उन्ह, इत्यादि सर्व शब्दच त्यामुळे निमाले."

* * * —

" केवढें वादळ शांत झालें! एकहि झाड कोसळलें नाही. एकहि घर पडलें नाही! एकहि जीव दगावला नाही!

" तथापि–ही–ह्या काळ्या फत्तराच्या कपारींतून ही झरी वाहते आहे ती ?

" पण त्याची दखल फत्तराने घेतली नाही. वारा पाऊस धैर्याने सहन करीत स्थितप्रज्ञासारखा तो 'प्रसन्न' आहे.

" वाळवंटांत पाणस्थळीच्या विसाव्यावाचून चालविलेली दौड! ती तर्कावर घासून बहुधा निरर्थक ठरते. पण कुणाच्या तरी अनर्थकारी कृत्यावरच पुढचा सर्व अर्थ उभारला जातो असा मानवजीवनाचा अनुभव इतिहासाने नमूद केला आहे.

" आणि वाळवंटांतील पाणथळांचा विसावा सुखदायी कोणाला ? आम्हांला ? आमच्या हृदयांना! सर्वच प्रश्नांचीं उत्तरें उपमा–रूपकांनी मिळत नसतात.

"अनेक संघर्षांनी आमचें हृदय तापलेलें असतें. असें तप्त की जसें लोखंड लाल होतें; असें तप्त की जशी काच तापते! आणि

या तप्त काचेवर तुमच्या त्या उपमेंतील पाणथळ—जलाचे थेंब पडले की, तिचे तुकडे होतात.

"आणि या चार दिवसांसाठी येवढा वितंडवाद कशाला? सायंकाळ होत आली आहे. झाडांचा हिरवा रंग काळसर झाला आहे. थंडी झोंबत आहे. आणि ती पहा सातपुड्यांतील वाघाची गर्जना कानीं येत आहे. भव्य गर्जित!"

* * * —

त्याने पुढे काय केलें व त्याचें काय झालें हें कळलें नाही.

त्यानंतरचें त्याच्या वहीचें एक पान जरी वाचतां आलें असतें तरी त्या अज्ञात प्रयोगवीराचें जीवनसूत्र कळणें सुलभ झालें असतें. तथापि—

तृषार्त जेव्हा ओंजळ भरून निर्मल गंगेचें पाणी तोंडाला लावतो तेव्हा ही नदी कोणत्या समुद्राला मिळाली असेल याचें संपूर्ण ज्ञान झाल्याने त्याच्या तृष्णेचा जास्त उपशम होतो असें थोडेंच आहे!

वर्धा, ५–१०–४५

## ९ सन्मार्ग

या भूभागाच्या इतर दुसऱ्या ठिकाणीं त्या उद्देशाने खपणाऱ्यांच्या श्रमांना चांगलीं फळें आलीं असतील. येवढेंच काय, पण ही घटनाच केवळ अपवादरूप असेल. सबब तिचें वर्णन करून त्या प्रयत्नांना दूषण लावण्याचा उद्देश नाही. जें होत आहे तें एकदम वाईट किंवा अगदी अव्यंग असाहि अभिनिवेश हें लिहिण्यांत नाही. किंबहुना घटनेला प्राधान्य देण्याचा प्रयत्नच मी करणार नाही. जें थोडें रंगाचें सामान मला उपलब्ध आहे त्याने मी केवळ भाऊरावांचें चित्र काढण्याचा प्रयत्न करणार आहे. साधलें तर किती चांगलें होईल !

भाऊराव मला अपरिचित नव्हते. माझे कपडे मला वेळेवर शिवावयाचें झाल्यास मी त्यांच्याकडे देत असे. त्यांनी कधी कुणाची मुरवत करून धंदा बिघडविला नाही. आज त्यांच्याकडे कापड दिलें तर मोजून चौथ्या दिवशीं सकाळीं ते कपडे देत असत. रोज आठ तास खपून जें काम होणें शक्य आहे तेवढेंच ते घेत. “ निकडीचें” “ जास्त भाव पडतील ” इत्यादींच्या गमजा त्यांच्याजवळ नसत.

" भाऊराव, लग्नाची तिथि परवा आहे. एकच दिवस अगोदर तुम्हांला कपडे द्या म्हणतों."

" साहेब, आपण एक दिवस अगोदर आलां असतां तर कसेंहि करून तुम्हांला मीं कपडे दिले असते; पण इतर ग्राहक . ."

" प्रत्येकाच्या घरीं लग्न थोडेंच आहे ! ते थांबूं शकतात, तुम्ही हवे तर जास्त पैसे घ्या..."

" लोक कपडे करतात तें गरजेने किंवा आनंदासाठी, त्याचें मोजमाप जास्त कमीच्या मापाने कसें करणार ? जास्त पैसे घेण्याची सवय साहेब, मला लावून घ्यावयाची नाही."

त्यांना धंद्यांतून जे पैसे मिळत ते अगदी पगाराइतके नियमित. पैसे घेतल्याशिवाय त्यांनी कपडे कधी दिले नाहीत.

" भाऊराव, पैसे चार दिवसांनी पाठवून देईन."

" साहेब, आपण इतमामाने थोर दिसतां. माफ करा. पण पैसे मिळायला हवेतच. तुमचे कपडे वेळेवर मिळाले तर तुम्हांला आनंद. तुमच्याकडून वेळेवर पैसे मिळाले तर आम्हांला आनंद–"

" अहो, पैसे किंवा मी कुठे पळून का जाणार आहेत ?–"

" असेंच मलाहि म्हणता येईल साहेब ! पण मला आपले पैसे द्या म्हणजे झालें—"

त्यामुळे कांही ग्राहक तुटत, पण बरेच नवे लागून रहात. आलेल्यांचें हसून स्वागत करावयाचें. जाणाऱ्यांचीहि हसून बिदागी करावयाची ही त्यांनी आपली स्वभावगोष्ट करून टाकली होती.

मी त्यांच्या दुकानाच्या पायरीवर पाऊल ठेवलें तेव्हा ते दुकान बंद करण्याच्या तयारींत होते. सायंकाळचे सात वाजले होते. प्रश्नार्थक मुद्रेने त्यांनी माझ्याकडे पाहिलें—

"दुकानासबंधींचें काम नाही. पण तुम्ही आता जाण्याच्या तयारींत आहांत. थोडें बोलावयाचें होतें एवढेंच! बरें, उद्या येईन. मग बोलूं!"

"मी बाहेर म्हणून जात नाही. दुकान बंद करून घरीं जात आहें. तुम्हांला अडचण नसेल तर आपण दोघे घरीं जाऊन चहा घेऊं. पण बोलण्यासारखें असें माझ्याशीं तुमचें काय काम आहे न कळे! बरं चालतां ?"

माझ्या चेहऱ्यावरूनच त्यांना माझी संमति ओळखूं आली. त्यांनी दुकान व्यवस्थित बंद केलें. दारावरचा साईनबोर्ड खिशांतल्या रुमालानें स्वच्छ करून रुमाल पँटच्या खिशांत ठेवला. जणुं त्यांच्या गैरहजेरींतच त्या बोर्डाचें खरें काम!

आम्हीं निघालों. चार कदमांवर त्यांचें घर होतें. दाराला कुलूप होतें. दाराजवळच्या वळचणीला एक शिंकें तारेने पक्कें केलें होतें. शिंक्यावरच्या भांडयांत गवळी दूध घालून गेला असावा. कारण दुधाची हिसळ भांड्यावर ओघळत होती. दार उघडतांच किंचित् हसून त्याने मला "या" म्हणून आंत घेतलें. खोलीला तीन खिडक्या होत्या. प्रत्येकीला निळ्या उजळ रंगाचे पडदे घातले होते. पडद्यावर हातकाम करून कुंडयांतून फुलें काढलीं होतीं. दोन स्वच्छ अभ्राच्छादित अशा प्रशस्त खुर्च्या ठेवलेल्या होत्या. त्यांच्या झालरी

वाऱ्याच्या मंद झोताने हलत होत्या. एक छोटें टेबल, त्यावर कव्हर घातलेलीं चार दोन पुस्तकें. खाली एक मोठीशी सतरंजी. खोली फारशी सजलेली नव्हती. परंतु प्रत्येक वस्तूवर भाऊरावांचा हात फिरल्याच्या खुणा मात्र सर्वत्र दिसत होत्या. जी वस्तु ज्या ठिकाणीं ठेवली ती वस्तु स्थानांतराने शोभली नसती याचाहि प्रत्यय येत होता.

कपडे बदलून झाल्यावर भाऊराव माझ्याजवळ आले आणि हसले. या वेळीं मात्र त्यांचें हास्य माझ्या लक्षांतून सुटलें नाही. टपोऱ्या कळीमध्ये करांगुली घालून, फुंकर घालून आपण ती फुलवितों तसें—आणि ते म्हणाले—

"माझ्या हाताने शिवलेले कपडे तुमच्या अंगावर आहेत. माझ्याच हाताने केलेला चहाहि तुम्हांला देतों आता. ही माझी खोली आणि या खोलीचेंहि सर्वस्व मी. म्हणून हा थोडासा विनोद करून तुम्हाला आपली सूचना देतों." येवढें बोलून दुसऱ्या कोपऱ्यांतील टेबलावरचा स्टोव्ह त्यांनी पेटविला.

एक साधें ट्रे. त्यावर पांढरें स्वच्छ कापड. बिस्किटांनी भरलेल्या बशा आणि दोन स्वच्छ कपांतून चहा येवढें सर्व साहित्य सजवून त्यांनी मधल्या टेबलवर ठेवलें. आपण एकटे आहोंत म्हणून थोडा अव्यवस्थितपणा दाखवून आपल्या एकलेपणाचें, प्रतिष्ठेचें समर्थन करावें–थोडासा चेहरा पाडून " पहा बुवा कसा तरी गोड करून घ्या " म्हणावें असले भाव त्यावर उमटविण्याचा त्यांनी यत्किंचित् प्रयत्न केला नाही. उलट जी तयारी इथे केली गेलेली

आहे त्यांत कसलीहि उणीव नाही हाच विश्वास त्यांच्या चेहऱ्यावर दिसत होता. समग्र जीवन त्याच्या विविध अंगोपांगांनी जगायला घ्यावें आणि त्या सर्वांत सौंदर्य ओतण्याची साधना करावी आणि मग त्या साधनेचें समाधान !

इतक्या सर्व तयारीनंतर चहाचा कप हातीं देऊन भाऊराव हळूच ' आता बोला ' असें म्हणाले, तेव्हा काय बोलावें याची मला पंचाईत पडली. इतक्या चांगल्या, शांत, विश्वस्त, विश्रब्ध वातावरणांत बोलण्यासारखा माझा विषयच मुळी नव्हता. सुरुवात कशी करणार ?

" का ? आणखी कांही हवें तुम्हांला ? "

आता सुरुवात करणें भाग होतें. मी सरळच त्यांना सांगितलें—

" माझ्या कपड्यावरून, माझ्या नित्य व्यवसायावरून माझा पेशा तुम्हांला माहीत आहे. चार सहादां या ना त्या अवांतर कारणांनी मी तुम्हांला भेटलों आहे. तेव्हा सरळच सांगतों. मी तुम्हांला अशी विनंति करायला आलों आहे की, तुम्ही येत्या निवडणुकींत आपलें मत कॉंग्रेसला द्यावें. कॉंग्रेसने जनतेसाठी खूप केलें आहे आणि जनतेनेहि तिला अपेक्षेबाहेर साथ दिली आहे. कॉंग्रेसला असें दाखवावयाचें आहे की, या देशाची उभी जनता तिच्या मागे आहे. तिला दडपून, ठेचून, तिच्या प्रीत्यर्थ जनतेचें रक्तरंगण करूनहि ती दबली नाही. आणि जनताहि भ्याली नाही. आईने मुलाला हाक मारली आणि मुलांनी आपल्या जखमांवर हात ठेवून तिच्या हाकेला ओ दिली, या गोष्टींचा प्रत्यय आज

सरकारला आणून द्यावयाचा आहे. ज्या वेळीं सर्वांची आहुति पडत होती त्या वेळीं त्या यज्ञाला विस्तव समजून इतर पक्षांनी त्यावर हात शेकून 'शीत-त्राण' केलें. तेव्हा ते पक्ष जनतेच्या हिताच्या दृष्टीने खरे नव्हत हेंहि यांतून दाखवून द्यायचें आहे. गोष्ट अगदी साधी आहे. मतच देण्याचा प्रश्न आहे; पण या बाबतींत बुद्धि आणि भावना यांची साक्ष घेऊन हें काम तुम्ही करावें अशी माझी तुम्हांला विनंति आहे."

इतकें बोलून मी थांबलों आणि त्यांच्या चेहऱ्यावर कांही परिणाम होतो किंवा काय हें पाहूं लागलों.

भाऊराव अगदी शांत होते. चेहरा निर्विकार होता. एक शब्दहि ते बोलले नाहीत. याचा अर्थ माझ्या मनाप्रमाणे समजून मी अवांतर गोष्टीने विषय बदलवून त्यांची रजा घेण्याचें ठरविलें. आणि शक्य तितक्या आपलेपणाच्या आवाजांत मी त्यांना सहज विचारलें—

"तुमच्या घरीं कुणीच नाही ? एकटेच तुम्ही ! सर्व तुम्हांलाच करावें लागतें ? फार ताण पडत असेल नाही ?"

"मुळीच नाही ! ताण उलट कमी होतो. मला सर्व प्रकारची चांगली सवय आहे. एकटेपणाविषयीं म्हणाल तर कांही दिवस मी मी दुकटा होतों आणि आज पुनः एकटा आहे."

माझ्या चेहऱ्यावरचा प्रश्न त्यांना दिसला असावा. म्हणूनच ते हसले—अगदी मघासारखे आणि—

" तुम्हांला थोडी उत्कंठा वाटत आहे. माझ्या पत्नीच्या मृत्यूचें दुःख दर्शवावें अशी तुमची मनीषा दिसते आहे. पण तसें कांही नाही हो ! तुम्ही बुद्धि, भावना वगैरे मघांशीं कांही म्हणालांत आणि मतासंबंधीं कांहींतरी बोललांत. पण तसल्या भावना मला आता फारशा राहिल्या नाहीत. मी थोडा स्वार्थी आहे आणि त्या गोष्टी मी माझ्यापुरत्याच वापरतों. त्या व्यतिरिक्त त्यांचा उपयोग करण्याची माझी प्रवृत्तीहि राहिलेली नाही. एकदा कांही सराव नसतां अशाच भावना वापरण्याचा मीं प्रयत्न केला आणि तो झक्क फसला. मी आपला आता हसतों आणि इतर गोष्टींत मन घालतों. मला थोडें गातां येतें. चांगलें साहित्य वाचण्याचीहि आवड आहे. बऱ्यापैकी चार दोन मैदानी खेळहि येतात. आठ तास मन लावून मी माझें शिवणकाम करतों. आणि यांतच सर्व वेळ निघून जातो. साहित्य, संगीत, कला सगळें साधतें आणि,–अगदी मजा आहे !"

ते हसले पण माझ्या चेहऱ्यावर त्यांना प्रकाश दिसेना. म्हणून ते पुढे बोलूं लागले–

" तुम्हांला कांही फारसा बोध होत नाहीसें दिसतें. आणि तें खरेंहि आहे. तुम्ही त्या वेळीं इथे नव्हतां. तुरुंगांत असाल. पण तें सर्व वर्तमानपत्रांतून आलें होतें हो ! तथापि इथले पेपर्स तुम्हांला कदाचित् त्या वेळीं मिळालेहि नसतील. अहो ! मी तीन वर्षांपूर्वी लग्न केलं होतं. बायको मिळविली आणि घालविली पण ! आणि जसा होतों तसाच राहिलों. " भाऊराव अगदी मनापासून हसले आणि—

" सांगतोंच तुम्हांला सगळं आता. एक दिवस दुपारीं दोनच्या सुमारास तुमच्या एका राजकीय पक्षाचे एक गृहस्थ माझ्याकडे आले आणि मला म्हणाले, 'भाऊराव ! अमुक एक मापाचा एक ब्लाउझ अगदी आताच्या आता शिवून द्या. मी चौपट पैसे देतों." मी त्यांना सांगितलें-"शक्यच नाही, पैसे एकपटच द्या, ब्लाउझ तीन दिवसांनी नक्की देईन." तेव्हा ते गृहस्थ म्हणाले,-'अहो, तसं नाही. तिला आम्ही मुसलमानाच्या कचाटयांतून सोडविली आणि आता चार वाजतां तिला शुद्ध करून तिचें हिंदु नांव निर्मला ठेवावयाचें ठरविलें आहे. दिसायला ती सुंदर आहे. तिला एकादा छानसा नवरा शोधून देऊं आणि सन्मार्गाला लावूं. तुम्ही ब्लाउझ करून द्या. तुम्हांला हें सर्व कळूं शकतं. तुमच्या चांगुलपणाबद्दल आम्ही पुष्कळ ऐकलं आहे. तुमच्याकडून नकार घ्यायला मी मुळीच आलों नाही. इ...."

" पूर्वसंचितानेच म्हणाना, पण माझं हें परीटघडीचं मन सुद्धा थोडंसं हललं. त्या भावनाचिवना ज्या म्हणतात त्या जागल्या आणि मी ब्लाउझ कापायलाच घेतला. दोन तास मन आणि हात चालत होते. सुंदर ब्लाउझ शिवून झाला. माझ्या कलेवर मीच खूष झालों म्हणा—मी ओढलाच गेलों. आजच्या माझ्या मनाची भाषा वापरावयाची म्हणजे घसरलोंच म्हणा आणि कांहीसें साहस म्हणून, पुरुषी अवखळपणा म्हणून, आजवर वाचलेले उन्मादाचे अनुभव घ्यावे म्हणूनहि असेल कदाचित्—पण चार वाजतां जेव्हा ते गृहस्थ आले तेव्हा मी म्हणालों—

" का हो ! मुलगी सुंदर आहे म्हणतां, तरुण आहे म्हणतां, तिला उपरतीहि झाली आहे. हें पहा, मी जातीनें हिंदू आहें, अव्यंग, निर्दोष आहें, घरीं थोडीशी मायाहि आहे. धंदा छान चालतो. शरीर दणकट आहे, चार दोन घाव सुद्धा सहन करतां येतील, देतांहि येतील. माझ्यामागे व्याप नाही, पाश नाही. मी करतों तिच्याशीं लग्न. पहा जमलं तर. तुम्हांलाहि बरं आणि मलाहि ठीक !

" आणि आता तुम्हांला सांगूं काय !–तो गृहस्थ जवळ जवळ नाचतच गेला–

" त्या सायंकाळीं आमचें लग्न झालें. मारे बातम्यावर बातम्या, हारांवर हार, माझें नीतिधैर्य, मनोधैर्य, धडाडी आजवर न केलेली ' लोकांची, ध्येयांची, देशाची सेवा ! '–स्तुतीचीं, अतिशयोक्तीचीं सगळीं सुमनें, फुलें, अगदी पाटयाच्या पाटया निर्माल्य भरतील इतकीं ! मी बिलकुल हरभऱ्यावर चढलों होतों. कधी नाही तें तीन चार दिवस दुकान बंद ठेवलें. निर्मला मला फार बरी दिसली व मीहि तिला आवडल्याचें तिने तेवढयांतल्या तेवढयांत पुष्कळदा म्हणून दाखविलें.

" सहा महिने अगदी धुंदींत गेले. खूप प्रवास, खूप मजा. तिचा स्वभाव खूप विलासी होता. मलाहि सर्व कांही अनुकूल होतें. दिल्लीला गेलों, लाहोर आटोपलें, अमृतसर पाहिलें, आगऱ्याला राहिलों–किती तरी ठिकाणीं हिंडलों, फिरलों, मौज केली. सगळीं चांगलीं विशेषणें निर्मलेने मला लाविलीं. आणि मीं तिला. तिच्या

साहाय्याने एक मोठा सामाजिक आणि म्हणून राजकीय प्रश्न मीं भावनेने सोडविला होता.

"तसे तिच्यांत दोष पुष्कळच होते. उभयतांच्या भरदार तारुण्याशिवाय दुसऱ्या एकाहि गोष्टीचा आम्हां दोघांत मेळ नव्हता. तिला जीवनाचीं सर्व अंगें प्रिय होतीं. त्यावर आसक्ति होती. फूल घ्यावें, हुंगावें, फेकून द्यावें! अहो, साधी गोष्ट पहा ना—मी तिला माझी सर्व कलाकुसर खर्च करून कपडे करून देई, पण ब्लाउझ अंगांतून काढून टाकल्यानंतर, खुंटी, टेबल, स्टोव्ह, चुलीजवळचें भिंतखंड, न्हाणींतला हौद यांपैकी तो कशावर ठेवावा याचा निर्णय ती माझ्याजवळ वर्ष-भर राहूनहि तिला घेतां आला नव्हता. आता तुम्ही बसलांत ही खुर्ची कधी कपड्यांवर असे तर कधी कपडे हिच्यावर असत. घर आणि जंगल या दोन्हींचा प्रत्यय याच खोलींत अगदी इंग्रजी दैनिकासारखा नियमित येत होता. पण याबद्दल मीं एका शब्दानेहि निर्मलेला दूषण लाविलें नाही. उलट मी तिला म्हणत असे— "निर्मला! हें घर अगदी रान झालें असलें तरी तूं त्यांतलें रानफूल आहेस. मला आपली तूं आवडतेस." तीहि असंच म्हणायची.

"त्यानंतर एकदा आम्ही मसुरीला गेलों. पैसे वगैरे खूप खर्च झाले. तिनेच तिथे कांही ओळखी लावल्या. अगदी आठ पंधरा दिवसांत, अगदी हॉटेलच्याच मुक्कामांत! त्या ओळखीच्या गृहस्थांपैकी कुणी तिच्या कुठल्याशा काकाचे, मामाचे मित्र निघाले. मीहि आपला त्यांचें स्वागत करून माहेरच्या माणसाच्या नात्याने

त्यांना चहा, सिगारेट्स् दिल्या; गप्पागोष्टी, फिरणें, खेळणें, पोहणें—सगळें यथास्थित होत होतें.

" आणि आता संपवावयाचें म्हणजे ती एक दिवस जी गेली ती कांही परत आली नाही. रात्रीपर्यंत वाट पाहून मी सामान शोधायला लागलों तेव्हा तिचें म्हणून असलेलें नित्याचें सर्व सामान ती घेऊन गेली होती. एक चिठ्ठीहि ठेवली होती तिने. त्यांत लिहिलें होतें—

" ' मी मसुरींतच आहें. तुमच्याजवळ मात्र रहाणार नाही. माझा शोधबोध केला तर मी सापडेनहि; पण पुनः माझ्या शुद्धि वगैरेची खटपट करावी लागेल तुम्हांला. नांव बदलविलें की गावहि बदलावें लागेल. तेव्हा उगीच त्रास करून घेऊं नका. तुम्ही फार चांगलें वागविलें मला–थॅंक्स—'

" हे थॅंक्स तिने मला देवनागरींत लिहिले होते बरं का ! मी त्यांतलें सर्व इंगित आपल्या स्वभावाप्रमाणें ओळखलें. परत गावीं इथें आलों. सगळे कपडे धोब्याला दिले, भांडींकुंडीं सगळीं चक्क घासून टाकलीं. खोलीला सफेती केली. पुस्तकांना कव्हरें घातलीं. सर्व नीट केलें.

" कधी कधी वाटून जातं की एकवेळ निर्मला येथे होती आणि आज ती नाही. पण आपणच आपल्याबद्दल दया दाखविली की लोकहि दाखवितात. त्या मार्गाने जाणें मला आवडत नाही. आता ही माझी खोली आणि माझें दुकान. भावना वगैरेसारख्या गोष्टींकडे माझें लक्ष आता जात नाही. एवढेंच काय, पण माझ्याकडे निर्मलेसाठी ब्लाउझ शिवायला आलेले ते गृहस्थ माझ्याशीं बोलले नाहीत तरी मी त्यांच्याशीं बोलतों.

"आणि अगदी सीमेची गोष्ट सांगावयाची म्हणजे या महिन्याच्या आंत दोन तीनदा मीं पाहिलें, निर्मला ही अशी टांग्यांत बसून माझ्या दुकानासमोरून गेली. मीं आपला पाहतों एवढेंच. ती अशीच इथल्या कुठल्यातरी पुन्यातच रहात असावी. तिच्या रूपाने राजकारण, समाजकारण, धडाडी; नीतिधैर्य, देशभक्ती, सेवा सगळें टांग्यातून हिंडत असतें. मी आपला हसतों आणि लोकांचे कपडे घेतून त्याना ते तीन दिवसांत परत करतों. पैसे नगदी, व्यवहारांत विलंब, उधारी नाही. जाऊं द्या. पुनः एकदा आपण चहा घेऊं नाही का ?—"

भाऊराव अगदीं झक्क हसले व त्या हास्याचें पृथक्करण करतां करतां माझी पुरेवाट, त्रेधातिरपिट उडाली. एक शब्द बोललो नाही. खुर्चीच्या गवमणीवर काढलेल्या फुलाशीं खेळत मीं चहा संपविला आणि आपाततः त्यांना नमस्कार करून बाहेर पडलो.

दाराशीं त्यांनी मला निरोप दिला "अहो, त्या ब्लाउझच्या दिवशी जसं झालं तसंच कांहीसं आज माझ्या मनाचं झालं आहे. कसं चाळवल्यासारखं होतं आहे. तुमच्या कामाबद्दल मात्र सांगून देतों. तुम्ही मेहरबानी करून मला वेळेवर आठवण करून द्या. मी देईन तुमच्या मंडळींना मत–मित्र स्नेही म्हणून–अच्छा, नमस्कार, पुनः भेटूं—"

भाऊराव भेटतात, हसतात–अगदीं पूर्वीसारखे. परवा जरा खवचटपणें ते म्हणाले–"काय हो ! तुम्ही जपूनचिपून तर नाही वागत ना माझ्याशीं ?"

याचें उत्तर काय देणार ?

वर्धा, १३-१२-४५.

## १० पराभव

गेल्या सबंध कृष्णपक्षांतील हीं जागरणें. वॉर्डरने माझ्या कोठडीवरून किती फेऱ्या घातल्या, त्याचे बूट कितीदां वाजले, त्याच्या घशाला कोरड पडून तो कितीदां खाकरला हेंहि मला सांगतां येऊं शकेल इतक्या आलोचन रात्रीं मीं काढल्या. डोळे थकले पण मिटले नाहीत; शरीर शिणलें पण विसावलें नाही. आजवरचा अभ्यास, संयम सर्व निरुपयोगी ठरलें.

हा असा पराभव कबूल करायचा? आजवर मोजून पावलें टाकलीं, निश्चयाने, धडाडीने हिंमतीने पुढे झालों. इतरांनी माझ्याकडून दिलासा घ्यावा आणि मला आज बेदिल वाटावें. माझ्या मार्गावर इतरांनी डोळे मिटून पुढे चालावें व माझा मार्ग मला अंधारून आल्यासारखा वाटावा.

आणि आज तरी काय! बाहेर सर्वत्र माझ्या यशाचा डिंडिम वाजत आहे. धैर्याचे सर्वत्र पोवाडे गायले जात आहेत. या तुरुंगांतील चारशें राजबंद्यांपैकी एकाचेंहि माझ्यावाचून पान हालत नाही. नवा मनसुभा मी करीन, नवे डाव टाकीन तेंहि मीच!

दोन हजार कैद्यांच्या जीवनरहाणीवर तात्पुरतें का होईना पण स्वामित्व गाजविणारा तुरुंगाचा अधिकारी विडा उचलून आला होता, मला नामोहरम करीन, भीतीने दराऱ्याने अर्धमेला करीन म्हणून! जेवढीं शस्त्रें त्याला उपलब्ध होतीं तेवढीं सर्व त्याने माझ्यावर फेकलीं. माझ्या अंगावर घोंगडी टाकून सदंड अशा आठ वॉर्डरांकडून त्याने माझी "कंबल—परेड" करविली; माझ्या सेलमध्ये पांच पांच काळे विंचू सोडले; माझ्या गात्रांना विसावा मिळूं नये म्हणून दंडाबेडी दिली, गुप्तभागीं मर्मावर मार दिला, शरीराची शुद्ध नाहीशी होईपर्यंत एका जागेवर खिळून ठेवलें आणि या सर्व छळाची कुठे नोंद न करतां तो सर्व करूं शकला इतकी सत्ता त्याच्या ठायीं केंद्रित झाली होती. त्याचा उद्देश प्रामाणिक होता—मीं नमावें, मी हरावें, त्याला मोठें मानावें, हा तुरुंग आहे, हॉस्टेल नव्हे, येवढीच फक्त कबुली द्यावी. त्याच्या दृष्टीने ती अगदी साधी गोष्ट होती. राजबंदी हसत तें त्याला सहन होईना. ते विजयाचीं गाणीं म्हणत व त्याच्या कपाळांत तिडिक उठे. आम्ही कसें हसूं शकतों, आमच्या प्राणज्योतींना कुठून स्नेहाचा पुरवठा होतो याची चौकशी करण्याचें त्याला कारण नव्हतें. तिथवर त्याची पोच नव्हती. सरळ धोपटमार्गाने त्याने छळ सुरू केला. मी सर्वांचा म्होरक्या म्हणून प्रसादपुष्पांजलीचा वाटा प्रथम माझ्याकडे आणि तोहि भरपूर.

पण परिणाम ? जो ईश्वराने निर्मिला तो यांच्याने कसा नाहीसा होणार ? अन्नपाणी, जीवित एक नव्हे दोन नव्हे चार आणि तीस दिवस मला त्याने विष केलें, पण नियमित वेळीं जेलची शिस्त

म्हणून माझें वजन घ्यायला आलेला तुरुंगाचा डॉक्टर नोंद करून गेला. " वजन एक औंसहि कमी झालें नाही. " त्याने माझ्या तिकिटावर लिहिलें, " प्रकृति अगदी निकोप आहे. " तुरुंगाला भेट देणारे बाहेरचे सुखवस्तु प्रतिष्ठित आले आणि त्यांनी बाहेर बातमी नेली, " प्रबोधचंद्राच्या चेहेऱ्यावरील हास्य पूर्ववत् आहे, त्याच्या मुखावरची दीप्ति कमी झाली नाही, विनोदबुद्धि कायम आहे. काळ्या मातींतल्या गुलाबाच्या ताटव्याने गेंदेदार फुलें द्यावीं, बालकाने ज्या उत्साहाने, बेफिकिरीने बाह्य जग न्याहाळावें, सायंकाळीं रानांतून चरून आलेल्या गाईच्या पाडसाने कानांत वारा भरून उनाडणें सुरू करावें, त्याप्रमाणे प्रबोधचंद्राच्या शारीरिक आणि मानसिक क्रिया उमेदीने, उत्साहाने सुरू आहेत. "

वृत्तपत्रांनी छापलें. जनतेने वाचलें. कित्येकांनी त्या दिवशीं गोडधोडहि करून खाल्लें असेल !

इकडे अधिकाऱ्याने आपला विडा खाली ठेवला. घशांतील आंवढा गिळला आणि मुठींत नाक धरून माझ्याशीं सामोपचार केला. व्यवस्थापक म्हणून त्याची नालायकी शाबीत झाली व त्याच्या जागीं दुसरा मोठा अधिकारी पाठविला गेला. तुरुंगाचा संबंध नसलेला, मन बुद्धि समर्थ, निरोगी असलेला.

माझ्या समदुःखीयांनी टाळ्या वाजविलेल्या मला त्यावेळीं माझ्या कोठडींत ऐकूं आल्या होत्या. पाय पडेल तेथे फुलें फुलावीं, दृष्टि पडेल तेथे मांगल्य, यश दिसावें, शब्द पोचेल तेथे आवेश चढावा—केवढा विजय, केवढा उन्माद !

आणि याज विजयी वीराने घालविलेली कालची परवांची रात्र ! अहंकार नको नको म्हणत असतांना मनाने कबूल केलेला पराजय ! " ती अहंता गळाली " " तो आत्मविश्वास गेला " " तें दैन्य कपाळीं आलें. "

मग काय ! मला जगतां आलें नाही असें म्हणावयाचें ? मी जगलों, इतरांना जगविलें ही केवळ फुशारकीच म्हणावयाची ? इथे या चार भिंतींच्या आंतील आचारांतहि माझें जगण्या जगविण्याचे उद्योग मीं सोडले नव्हते. माझ्या कोठडीच्या समोर कुठून तरी बीं पडून उगवलेला तो ज्वारीचा रोपा ! ऑगस्टांत मी आलों त्यावेळीं त्याचे देट पोवळयासारखे लाल होते. पोपटासारख्या नाजूक त्याच्या पानोळ्या होत्या. तासातासाने, दिवसादिवसाने तो वाढत होता. ९ सप्टेंबर आला, रोप मोठें झालें, पानोळ्या लहरूं लागल्या. मला जेव्हा जेव्हा कोठडींतून बाहेर काढलें गेलें तेव्हा तेव्हा माझ्या भांडयांतलें पाणी मीं त्याला घातलें; त्याच्या भोवतालची जागा स्वच्छ केली; त्याच्या पानोळयांवर हात फिरवून सुख अनुभविलें. वॉर्डरला सांगितलें याला उपटूं नकोस. त्याला पोटरी पडेल, कणीस येईल. तूं शेतकऱ्यांच्या देशाचा रहिवाशी आहेस. अर्धवट रोप उपटून कृषिदेवतेचा शाप घेऊं नकोस. त्याने तुरुंगाची शिस्त तेवढयापुरती संभाळून त्याला जगूं दिलें होतें. ऑक्टोबर आला, रोपा माझ्यापेक्षाहि उंच झाला. मातेचें वात्सल्य, सुहृदांचा सहवास, सवंगडयांचें क्रीडानर्तन अशा थाटांत त्याची जीवनयात्रा भराने, उमेदीने चालली होती. तो ढगाशीं बोले, वाऱ्याबरोबर निरोप

पाठवी. तिथल्या एका चिमणीच्या जोडप्याला त्याने आमंत्रण देऊन ठेवलें होतें की पुढील महिन्यांत माझ्या घरीं मेजवानीला या. दुधासारखे मधुर मोतीदाणे खाऊं घालीन. या सस्यश्यामल देशाचें निर्मल जल, मलयजशीतल असा पुण्यसरितावरून येणारा मधुर वारा, फळांना पिकवून त्यांत गोडी भरणारें ऊन—! आणि त्याला पोटरी फुटली, नंतर कणीस आलें. मिटलेल्या नाजुकनाजुक शिपल्या एकत्र होऊन आकारून आल्या. अगदी मिटलेल्या—ईश्वराची आज्ञा झाल्यावाचून अंतरंगांतले मोती दाखवायचे नाहीत असें नम्रपणें हसून सुचविणाऱ्या, "आज उद्या विश्वंभराच्या दरबारांतून वारा निरोप आणील आणि मग तुम्ही या. चिऊताई येईल, चिमणेदादा येतील!"

असें हें मंगलमय दृश्य! माझ्या जखमांवरून त्या रोप्याने हात फिरविला होता. मला बरें वाटलें म्हणून कणसाचे दाणे हसले होते.

अगदी कालपरवापर्यंत म्हणजे आपलें कणीस दुसऱ्याला देऊन स्वतः नामशेष होईपर्यंत मी त्याची जीवनलीला पाहिली होती. दुःखाचा लेश नाही, कसलीही उणीव नाही. परिपुष्ट, आत्मतुष्ट असें त्याचें सबंध जीवन—जलसिंचनाने, किरणस्पर्शाने, समीराच्या हिंदोळ्यांनी सुखावलेलें त्याचें जीवन मीं बघितलें होतें.

आज त्या रोप्याचा सजीवक सहवास नाहीसा झाला म्हणून ही अस्वस्थता? माझ्या या अभागी डोळ्यांनी दुष्टांनी निवटलेल्या हजारों जीवांचे विनाश पाहिले होते, व त्या वेळीं गलितगात्र होण्याऐवजीं मला आवेश चढला होता.

मग ही रुखरुख कां व कसली? सुखाचें जीवन आलें म्हणून? नव्या अधिकाऱ्याने प्रसंगीं कायद्याचें उल्लंघन करूनहि जास्त सवलती दिल्या त्या बोचतात म्हणून? पण जेव्हा हें शरीर गुलाबाच्या शेजेवर झोपलें, कमलासारख्या नाजुक हातांनी जेव्हा तें वेष्टिलें गेलें तेव्हा ही टोचणी कुठे होती? मग दुखतें काय?

परवा परवा नवा अधिकारी आला. त्याच्याबद्दल आपलेपणा, सद्भाव बाळगण्याची मला गरज नव्हती. त्यानेच स्मित केलें, तोच अभिवादन करता झाला. त्यानेच ही स्वतंत्र मोकळी सेल दिली. त्यानेच रोज सुवासिक फुलें माझ्या खोलींत ठेवायला वॉर्डरला हुकूम दिला. माझ्या सहकाऱ्यांच्या सुखाशिवाय मला हें वर्ज्य असें म्हणतांक्षणीं त्यानेच त्यांनाहि सवलती दिल्या. शेवटीं तो म्हणाला—

"आणखी मी तुमच्यासाठी काय करूं शकतों?"

"तुमच्या हातीं काय आहे करण्यासारखें?"

"फक्त तुमची सुटका सोडून बाकी या दोन चौरस मैलांच्या आवारांतील सर्व. कांहीहि लागलें तर सांगा, मी हवा तेव्हा येईन."

मी किंचित् उपहासाने हसलों.

"सुखाने, भलेपणाने मिंधे करून आमचें सत्त्वहरण करणार?"

"शक्य तेवढें सुखांत ठेवूं इच्छितों. मिंधेपणाची, सत्त्वहरणाची शंकाहि तुम्हांला माझ्या बाबतींत येतां नये. तुमचें शंकित मनच त्यामुळे उघडें पडेल."

" तुमच्या प्रामाणिकपणाबद्दल मी संशय घेणार नाही."

" पुरे आहे तेवढें मला. आणि माझ्या हातीं असें आहे तरी काय ? शरीराला मानवणारें चांगलें अन्न, शुद्ध ताजें पाणी, भरपूर प्रकाश व हवा, येवढयापुरतीच तुमची व्यवस्था मी करूं शकतों. त्यांत माझ्याने कसर व्हायची नाही."

" रागावूं नका, एक विचारतों, यांत उद्देश काय ? "

" उद्देश फार उच्च नाही. परदुःख दूर करून मला स्वर्ग मिळवायचा नाही. मी स्वार्थी आहें. माझ्यापुरतें मी पहातों. मला असें वाटतें की मीं तुम्हांला ओळखलें आहे. दिव्यांत तेल भरपूर आहे. आम्ही संघर्षाची आगकाडी ओढली तर तुमचा प्रकाश फाकतो आणि आमचे हात मात्र काळे होतात. मी माझ्या हाताने कधी काडी ओढणार नाही. शपथेवर सांगतों. सर्व बुद्धि तुम्ही खर्च केली तरी माझ्याकडून संघर्षाची अपेक्षा करूं नका. बरें, तुमच्यासाठी दूध येईलच इतक्यांत—"

तो शांतपणाने चालता झाला. कोण जिंकलें आणि कोण हरलें ? या विचाराने का मला काल परवापासून झोप आली नाही ? या अधिकाऱ्यापुढे माझी इतके दिवसाची साधना अपुरी पडणार ?

छे, मला कांहीएक उणें पडणार नाही. सर्व कांही जिथल्या तिथे आहे. फक्त माझा सहचारी रोपा नाही येवढेंच. पण त्याचें निर्गमन दुःखद नाही, त्याचें जीवितकार्य संपलें. त्यांत कसलें वाईट वाटायचें ?

तथापि नित्यनियमाप्रमाणे कंपौंडर नोंद करून गेला तेव्हा त्याने लिहिलें—" वजन कमी झालें आहे, " डॉक्टरांनी तीनतीनदा विचारलें—" काय होतें आहे ? काय कमी पडतें ? " तुरुंगाला भेट देणाऱ्यांनी विनोद केला पण त्यांना प्रत्युत्तर मिळालें नाही.

आणि हायरे दैवा ! या अधिकाऱ्याशीं बोलतांना मला संकोच व्हावा? माझी नजर खाली जावी ? माझी ?

" मी माझ्या हाताने दिव्याला आगकाडी लावणार नाही. कारण दीप्ति तुमची फाकेल. हात माझे काळे होतील. "

काडी लावल्याशिवाय जगतां येणें—जीवन ज्योत उजळणें !

भरपूर अन्न आहे, शुद्ध हवा, ताजें पाणी आहे, कल्याणतम रूप असलेल्या सूर्याचा रश्मिसमूह आहे.

तें रोज लाभेल, त्यासाठी शपथ होऊन चुकली आहे.

आणि माझें मन अशु होणार, शरीर खंगणार याचीहि शपथ होऊन चुकली आहे का ?

गेले कित्येक दिवस हा अधिकारी येतो. पाणी मागितलें की दूध देतो आणि माझी विषमाची मानगी वाढते.

जागरणाने शरीर कणकणतें, पाय उठत नाहीत. कुणी बोलायला नाही. हुकूम चालविणारे वॉर्डर हुकुमाचे ताबेदार झाले. ज्वारीचा तो रोपा— !

आता तिथे फक्त मुळापासून वीतभर उंच असा ज्वारीच्या धांड्याचा फणाच तेवढा राहिलेला आहे. वरचा धांडा कणसाच्या भाराने मोडला व वॉर्डरने उचलूनहि नेला होता. आता फक्त

विशीर्ण, जमीन धरून उभा असलेला तो फणा—माझ्या रोप्याचा तो अवशेष !

इथेच चार आठ दिवसांपूर्वी सजीव सुंदर मोत्यासारखे दाणे ओंजळींत घेऊन उभा असलेला रोपा होता. अमरपथाकडे निघालेल्या प्रवाशाच्या पूर्वपुण्याईच्या संकेताने एकाद्या देवदूताने रस्त्यावर पाथेय घेऊन उभें रहावें आणि आपलें काम होतांच वाट सोडावी !

पण ह्या फण्याच्या जोडावर, दोन्ही कांडयांवर हें काय ? नवे हिरवे अंकुर ?

याचेहि पोपटी रंगाच्या नाजुक पानोळ्यांत रूपांतर होईल ?

मुळांनी धरून ठेवलेल्या नुसत्या पाण्याने, साध्या हवेने, नुसत्या प्रकाशाने हे अंकुर पालवतील ?

" वॉर्डर ! "

" जी साहेब. "

" कंपौंडरला वजनाचा काटा घेऊन बोलाव. "

" ड्यूटीवरच्या कैद्याला पाठवितों. "

" आणि त्याला सांग म्हणावं की माझं वजन वाढलं आहे. "

वर्धा, ३०-३-४६.

# ११ हादरा

गेल्या पंधरा दिवसांत रशीदमियाँ बाजारसडकेनेहि गेल्याचें कुणी पाहिलें नव्हतें. त्यांचीं नित्याचीं ठिकाणें त्यांच्यावाचून सुनीं होतीं. त्यांच्या बकऱ्या त्यांनी विकून टाकल्याचें कळलें होतें. हंगामाचे दिवस असून खुडणावर* हि त्यांची हाजरी लागली नव्हती. त्यांच्या नांवाचा हारा† आमच्या खळ्यांतून घरीं येऊन पडला होता. वडील दोन तीनदा म्हणालेहि--" अरे, हा मिया गेला तरी कुठे? खुडण नेणार नाही तर बारा महिने खाईल तरी काय? हात थरथर कापतो आता त्याचा. डोळ्याने दिसत नाही. मशिनवर शिलाईहि सरळ येत नाही."

* शेतांत ज्वारीचे धांडे कापून झाल्यावर त्यांचीं कणसें खुडून रचतात. तीं चुरण्याच्या अगोदर हक्कदार, सालकरी इ. येऊन कणसें नेतात. न्हावी, धोबी, शिंपी इ. नित्यनेमाने शेतकऱ्यांच्या घरीं येणाऱ्यांना पैशाने मोबदला मिळत नाही. ते खुडणावर येऊन ज्वारी, कणसें घेऊन जातात व वर्षभर कामें करितात.

† मोठें शिंदीचें टोपलें ज्यांत पुष्कळ कणसें मावतील असें.

## हा द रा

मला येऊन कांही तासच झाले होते. पांच वर्षांनी, हजारों मैलांवरून नाना देशांचा अनुभव घेऊन मी परत आलों होतों. आई दृष्टिआड होऊं देइना. मलाहि बाहेर पडावेंसें वाटेना.

तरी देखील सायंकाळीं फिरायला म्हणून बाहेर पडलों व रशीदमियाचें घर गाठलें.

दार लोटले होतें. ओसरीकडील दुकानाची खिडकीहि बंद होती. मोठ्या उत्साहाने पांच वर्षांच्या गप्पा मारायला म्हणून आलों होतों. रशीदमिया माझ्या बाळपणींच्या अवखळपणाच्या गोष्टी काढतील, मी नशीब काढलें म्हणून माझ्यावर मनापासून स्तुतीचा वर्षाव करतील अशा अपेक्षेने मी घरून निघालों होतों. पण दार लोटलेलें पाहतांच मन चरकल्यावाचून राहिलें नाही. म्हातारा आजारी असेल, कण्हत कुंथत पडला असेल. ज्यापासून दूर आलों, पुनः तेंच! आजार, मृत्यु, रक्त, विवळणें, किंचाळणें, निराशा, खेद, उद्वेग यांनी परिपूर्ण अशा वातावरणांतून मी आलों होतों. आणि घरच्या आमराईंत, सुखाच्या शब्दांनी, मायेच्या घासांनी शीण घालविण्यासाठी मन आसावलें होतें. कुणी कितीहि जवळचा असो, त्याची सेवाचाकरी करण्याची इच्छाच नव्हती. जणुं केलें तें फार, जन्मभर पुरेल इतकें. आता करण्यासारखें जणुं कांहीच नाही! म्हणून मीं पाऊल परत घेतलें.

परंतु यांत भीतीचा अंश होता. ती भीतिच नाहीशी करावयाचें शिक्षण मी घेत होतों. थोडेसें आपल्याशींच मला हसूं आलें. तें घर म्हणजे कांही तोफेचा गोळा नव्हे की पोचल्याबरोबर धडाड्-

धूम असा आवाज होऊन आपला प्राण जाईल. घरांत जरा डोकावून पाहूं. टीक असलें तर आंत शिरूं. आजारी असला म्हातारा तर पाहूं काय करावयाचें तें--असा विचार करून मीं हळुंच दार लोटलें. उभे राहण्याचा पवित्रा असा होता की जणुं आंत डोकावतांच आपल्याला परत फिरायचें आहे.

तथापि तो पवित्रा तसाच राहिला आणि विस्मय करीत मी थबकलों जागच्या जागीं!

रशीदमिया आजारी नव्हते. कधी आजारी असतील अशी घराला अवकळा नव्हती. एक पांढरी चादर पसरून, मक्केकडे तोंड करून गुढगे आणि डोके जमिनीला लावून मोठ्या आवाजाने म्हातारा कांहीसें म्हणत होता. आवाज गदगदलेला व म्हणून अस्पष्ट. त्यावरून म्हाताऱ्याच्या डोळयांत अश्रु उभे राहिले असावे असें अनुमान निघत होतें.

थोडया वेळाने त्यांनी मान वर केली. हात छातीवर ठेवले. डोळे मिटलेलेच होते. आसवें वहात होतीं आणि अगदी मक्के-पर्यंत ऐकूं जाईल अशा आवाजांत म्हातारा आक्रंदत होताः—

"या अल्ला! आता या दुनियेंत राहण्यांत मजा नाही. तुझे हुकुम पाळण्याची या लोकांनी माझ्यांत ताकद ठेवली नाही. तूं सांगितलेंस की "तुझ्याजवळ पाणी मागायला आलेल्यांना तुझ्या तोंडचा भरलेला पेला तूं दे. तुझ्या तोंडची भाकर तूं भुकेल्याला दे. तुझा आंगचा कपडा तूं गरजूला देऊन टाक. मीं हें सर्व निर्माण केलें आहेत. त्यांना जगव! त्यांना जगव!"

" बिसमिल्लाहिर्‌राह्‌मानिर्‌रहीम !* या खुदा! मी सगळें करतों पण माझ्या हातचा पेला कुणी घेत नाही. माझ्या भाकरीला कुणी शिवत नाही. माझे कपडे खुंटीला टांगलेलेच राहून जातात.

तेवढे शब्द कांहीवेळ तसेच घुटमळत राहिले आणि पुनः-

" इय्याका ना आबोदो व इय्याका नस्त्वअीन । अेहॅदे नस्‌-सेरात्वल् मुस्त्वक़ीमा !† या अल्ला ! माझी भूकतहान नाहीशी झाली आहे. दुसऱ्याला देण्याची मला इच्छा राहिलेली नाही. पंचवीस वर्षांचा शेजारी आजारी पडला. आणि मी खोटें बोललों. हें तुला कधीच सहन होणार नाही. तुला सहन न होतील अशा पुष्कळ गोष्टी माझ्या हातून यापुढे घडूं शकतील.

" या खुदा! पागल माणसांवर तूं रहमदिल ‡ होऊं नकोस. त्याला या दुनियेंतून घेऊन जाण्यानेच त्यांच्यावर रहम केली जाईल. मरणाची ताकद माझ्यांत नाही. म्हणून तुझ्याजवळ भीक मागत आहें."

त्यांनी आपल्या सदऱ्याचीं समोरचीं दोन्ही टोकें उचलून झोळी धरल्यासारखें केलें व एक हुंदका देऊन डोळे उघडले. तोंवर

---

* अल्लाच्या नांवाने संकल्प करीत आहे, अल्ला दयालु, कृपाळु आहे.

† "तुलाच आम्ही नमन करतों आणि तुझ्या पासूनच मदतीची अपेक्षा करतो. आम्हांला सन्मार्गी लाव"

‡ रहम—दया, कृपा.

दार पुरतें उघडून मी आंत आलों होतों. रशीदमियांचें लक्ष माझ्याकडे गेलें. त्यांनी पुनः डोळे मिटले. प्रार्थना पुरी केली आणि मग माझ्याकडे पाहून मला बसण्याची खूण केली.

" कधी आलास ? "

" आज सकाळीं. "

" आता तूं बडा माणूस झाला आहेस ! "

" गावच्या लोकांसाठी नाही, आणि रशीदमियासाठी तर मुळीच नाही, तुमच्यासाठी मी तेवढाच आहें. "

" असें ! मग एक काम करशील ? "

" होऽऽ. "

" आता पळत शिवजीकडे जा. काल त्याची नवरी आली होती. त्याच्या शेतांत कुणसाचें चुरण मांडलें आहे. शिवजी जागली जात असे, पण परवापासून त्याचा ताप हटत नाही. तापाच्या भरांत सारखा बडबडतो. त्याची बायको मला मदतीला बोलवायला आली होती. म्हणत होती—'शेतांत जागली जा किंवा शिवजी जवळ बसा, मी जागली जात्यें '—साठ वर्षांत मी कधी खोटं बोललों नाही तें काल बोललों. तसेंच बोलण्याची बुद्धि झाली. तिला मीं सांगितलें की माझी उसण भरली आहे, माझ्याने उठणें बसणें होत नाही, मी येऊं शकत नाही. ती निघून गेली, पण माझें मन थांबत नाही कालपासून. त्याची बिचाऱ्याची काय स्थिति असेल ! ती पोरगी हक्काने मदत मागायला आली आणि मीं तो हक्क पुसून टाकला. आता मला तिथे जायला तोंड नाही, तूं जा लवकर.

तिला विचार कसें आहे शिवजीचें तें. आज शेतावर जागली हवा असला तर रशीदमियाची तयारी आहे म्हणावं. लवकर जा. परत आल्यावर मी तुला मिठाई देईन. "

जाऊन परत आलों तेव्हा रशीदमिया आतुरतेने माझी वाट पहात होते, त्यांना मीं सांगितलें कीं शिवजीचा ताप बरा असून त्याने तुम्हांला बोलावलें आहे. फार अंधार पडण्याच्या अगोदर येऊन जा असें सांगितलें आहे "

रशीदमियाचा जीव खाली पडला. त्यांनी उठून शिवणाच्या यंत्राच्या पुडांतून एक पुडी काढली आणि गुळांत पाकवलेले शेंगदाणे लहान मुलासारखे खरोखरच माझ्या हातावर ठेवले.

" राजा, अल्ला मोटा दयाळू आहे. माझ्या मनांत पाप आलें म्हणून तो शिवजीच्या दिलांत जाऊन बसला. आणि तिथं त्यानं मला बोलावलं. बरं, चल सांग तुझ्या हकीकती. कुठे हिंडलास ? काय काय पाहिलंस ? "

" इराकमध्ये गेलों होतों. इराण बगदाद पाहिले. आणि मग पुढे लढाईवर गेलों आफ्रिकेंत. माझ्या बरोबर रशीदबाबा, तूं आला असतास तर तुला मक्केला पोचवून दिलं असतं मी. "

" मुंबई पाहिलीस कां रे ? "

" हो ऽऽ "

" काय काय आहे तिथं ? "

" तिथं ! समुद्र आहे, मोठमोठया हवेल्या आहेत. श्रीमंत व्यापारी आहेत. तिकडल्या गाडया विजलीनं चालतात. लोक मोटारीं-

तून सारखे धावत असतात. ”

“ बरं! तिथं आमचा जातवाला एक माणूस दिसला कां तुला ? ”

“ म्हणजे काय ? पुष्कळच माणसं आहेत तुझ्या जातीचीं तिथं ! मोठमोठया मशिदी पण आहेत. ”

“ तसं नाही विचारत मी तुला, तिकडे आमचा जातवाला एक माणूस आहे. तो सांगतो म्हणे आम्हांला की आता तुम्हां लोकांबरोबर आम्ही राहूं नये. त्यानं आमच्यासाठी एक पाक देश मागितला आहे. तिथं आम्हां सगळ्यांना तो नेऊन ठेवणार आहे. ”

मला बोध होईना. रशीदमिया सांगतो काय आणि त्याचा माझ्याशी संबंध काय ? कशाचाच पत्ता लागेना.

“ आणि कायरे ? आम्ही साठ साठ वर्षं आमची उमर इथं घालविली ती ? या खेडयांतल्या अर्ध्या लोकांच्या अंगावर मीं शिवलेले कपडे आहेत. इथं लोक बिमार झाले मोठया मानगीनं तेव्हा मीं रात्रीं रात्रीं जागून त्यांचं दवापाणी केलं. तुझ्या बापानं माझ्याकडे ताट पाठविल्यावाचून कधी सण साजरा केला नाही. आणि आता तुम्ही चार पुस्तकं शिकून मला सांगायला आलां की मी निघून जाईन म्हणून ? तिकडं कुठं राहायला जाईन म्हणून ? ज्याचं नांव मीं कधी ऐकलं नाही, ज्याचं तोंड मीं कधी पाहिलं नाही त्याच्या सांगीनं मी निघून जाईन आणि अल्ला मला जाऊं देईल असं तुम्हांला वाटतं ? कुणी शिकवलं हें सगळं तुम्हांला ?

मीच म्हातारा सांपडलों कां तुम्हांला आपलं ज्ञान दाखवायला? दुसरीकडे कुठे दगड मारायला जगाच नव्हती? मसणांत जायचे आता माझे दिवस, मी आणखी कुठं जाणार?"

त्यांच्या चहेऱ्यावर संताप चीड आणि या सर्वांना झाकून टाकणारी असाह्यता भरली होती. कुत्र्याच्या ईमानदारीला खोट आणावी; गाईला दुष्ट म्हणून बोल द्यावा; पतिव्रतेच्या शीलाचा संशय घ्यावा. ज्या झाडाने साठ साठ वर्षे आपलीं पानें, फुलें, फळें बसल्या जागेहून लोकांना दिलीं तें झाड बज्जात, अवलक्षणी आहे असें मानावें; जो झरा निदाघार्तांना आजवर जगवीत आला, उन्हाळ्यांतहि ज्याची धार खंडली नाही, ज्याचें पाणी पिऊन दोन पिढ्या जगल्या त्या झऱ्यांतून विष वाहतें अशी आवई उठविली जावी; पाखरांना म्हणावें तुम्ही कर्कश ओरडतां; वैद्याला म्हणावें तूं आपपर भेद करतोस......

रशीदमियाँ कोलमंडून पडल्यागत भिंतीला टेकले.

"आता बोल मी तुझ्याशीं तरी कसा वागूं? तूं म्हणशील आता तूं खात असलेली मिठाई पण कडू आहे. काय नेम सांगावा आतां तुम्हां मंडळीचा."

मी स्तब्धच होतों. मुंबईच्या ज्या माणसाची चौकशी रशीदमियांनी केली त्याचा बोध मला हळु हळु होऊं लागला. परंतु इतक्या कडवटपणें या म्हाताऱ्याने हें सर्व कां बोलावें याचें मला कोडेंच राहिलें.

" तुला बंदुक चालवितां येते आता, नाही ? "

" होय, तोफहि डागतां येते. गोळे भरभरून शेकडों वेळां मीं तोफा डागल्या आहेत."

" किती माणसं मेलीं तुझ्या गोळयांनी ? "

" कोण मोजतो ? हजारों मेलीं असतील. रशीद बाबा! आता आणखी जोरदार गोळे निघाले आहेत. एक गोळा विमानांतून टाकला की वीस वीस मैल त्याचा हादरा बसतो. वीस मैलांच्या टापूंतील लोकांना इजा होते. "

" त्यांचे प्राण कशाला घेतां ? "

" आम्ही मुद्दाम घेत नाही. "

" मग काय, ते येऊन सांगतात आमचे प्राण घ्या म्हणून ? "

" तसें नाही. शत्रूला मारायला आम्ही बॉंब टाकतो आणि त्या टापूंतील इतरहि माणसं मरतात त्या तडाख्यांत. "

" आपली शेतीवाडी करीत असलेलींहि माणसं मरतात ? "

" होय. "

" आणि जीं लोकांसाठी घरें बांधतात तीं ? "

" तींहि मरतात. "

" आणि जीं कापड विणतात ? "

" तीं देखील मरतात. जीव जनावरं पण वाचत नाहीत."

" मग आजकाल काय, हेंच सगळयांना शिकवितात ? "

" सर्वांना नाही. जे लढाईवर जातात त्यांच्यापैकी कांहींना शिकवितात. "

" चला, तेवढें तरी बरें. हं, मग तो माणूस पाहिला कां तूं मुंबईचा ? "

" होय, तुम्हांला काय करायचंय त्याच्याशीं ? "

" मला ? मला काय करायचं म्हणा. पण मला वाटतें मी जाऊन त्याला एकदां भेटावं. "

" छट् कांही तरीच. तुम्हांला उगीच कुणीतरी मर्मी वार मारल्यासारखं भलतच सांगितलेलं दिसतं. तुम्ही म्हणतां तसं कांही नाही. "

" म्हणजे त्याचं नांव सांगायची तुझी इच्छा नाही म्हणेनास!

" नाही. "

" बरं, त्याला बायकामुलं आहेत कां रे ? "

" बायको होती ती वारली. मुलीनं जातीबाहेर लग्न केलं व निघून गेली. "

" म्हणूनच, म्हणूनच. त्याला घरादाराचा पाश नाही. आज इथं, उद्यां तिथं असं करतां येतं. लोक आजारी बिजारी झाले तर त्याचा दिल कधी दुखतो कां ? "

" माहित नाही मला. "

" त्याच्या दारावर कुणी भिकारी गेला तर त्याला भाकर मिळते कां ? "

" हेंहि ठाऊक नाही. रशीदबाबा, पांच वर्षे तुमच्या देशांत मी नव्हतों. मला कांही फारसं माहित नाही आणि तुम्ही विचारूं पण नका. मी आलों इथं तेव्हा मला कळलं की तुमचा खुडणाचा हारा घरीं पडला आहे. तुम्ही आजारी असाल असं वाटून सहज आलों. हें असंच बोलणार असाल तर मी जातों. मग येईन. "

रशीदमिया बोलले नाहीत. मीहि उठलों नाही.

" रशीदबाबा, दुसरं कांही तरी बोल ना! मशीन कशी काय चालते आजकाल?"

" महिना झाला मशीनला हात लावला नाही."

" तें लहान पांढरं रेशमी झबलं कुणाचं आहे! मोठं सुंदर बेतलं गेलं आहे आणि कपडा कुठून आणला हा रेशमी!"

" काय सांगूं राजा, माझं कपाळ!"

मी जणुं पळून जाईन अशा आशंकेने त्यांनी माझे दोन्ही हात गच्च धरून ठेवले.

" ह्या झबल्यानेच सर्व घोटाळा केला. आणि शिवजीला मदत न करण्याचें पापहि त्यामुळेच घडलें. तुला माहित नाही, एक दीड महिन्यापूर्वी या आपल्या खेडयांत एक नवलाची गोष्ट घडली. तेव्हांच त्या आमच्या मुंबईच्या जातवाल्याचं नांव निघालं होतं. आणि गेल्या साठ वर्षांत या रशीदमियाला कधीं कुणी उपदेश केला नाही, शिव्या शाप दिले नाहीत, ते पोरासोरांनीहि देऊन घेतले. तुझ्या वडिलांनी तुला सांगितलं असेलच......"

" नाही, मी त्यांच्याशी अजून फार बोल्लोंच नाही."

" बरं, या आपल्या गांवखारी जवळ एका झोपडींत विठया रहात होता आठवतो तुला? भाडं-भुसारं करून रहात असे—"

" अंहं "

" अंहं काय? तुला देखील त्यानं कित्येक वेळ स्टेशनवर पोचविलं असेल. त्यानं दोन वर्षं झालीं एक पाट केला होता. कुठून तरी एक खूबसुरत गोरीपान बायको आणली होती. विहिरीवर पाण्याला गेली की लोक तिच्याकडे टक लावून पहात. ब्राह्मणाच्या बायकाहि तिच्यापुढे कांही माल नव्हत्या.

" माझ्याकडे ती—बायनी—कपडयाचिपडयांच्या निमित्तानें बरेच वेळां येई. नाडलेली, गरजेने आलेली, अशी कांहीशी ती वागे. गांवांत एखादं नवखं माणूस यावं आणि त्याला चुकल्याचुकल्यासारखं वाटावं अशी ती रहावयाची. विठया तिला चांगलं ठेवीत असे....

" पण चार सहा महिन्यांतच ती निघून गेली. पहिले पहिले कांही दिवस ती माहेरीं गेली असें विठया सांगत असे. पण चार दोन महिन्यानंतर एक दिवस कुडतं शिवायला म्हणून विठया माझ्याकडे आला आणि त्यानं खरी हकीकत मला सांगितली. त्याची नवरी दुसऱ्या गांवीं कुणा जवानाकडे रहात होती. आणि विठयानं तिच्यापायीं खर्च केलेले पांचशे रूपये व्यर्थ गेले होते. तो दुसरा जवान लढाईवर मोटार चालवीत होता. आणि आजारी पडला

म्हणून कांही दिवस आला होता. विठया त्या वेळीं मिशीवर पीळ देऊन म्हणाला होता:—' रशीदबाबा, मीं बायनीसाठी पांचशे रुपये बरबाद केले पण ती धड नांदली नाही माझ्याशी. तिच्या हातची पोटभर भाकर देखील खाल्ली नाही मीं. तिच्याशी मनभर बोललों हि नाहीं. तिचा दिल इथं लागला नाही. ती मोटरवाल्या-पाशी राहते खरी पण एक दिवस तिला आणीन तरच नांवाचा विठया. आणखी सांगतों—तिला जबरदस्तीनं आणणार नाही. ती आपखुशी, आपसुख चालत येईल माझ्या घरीं—'

" नंतर पुढल्याच महिन्यांत त्याने आपली बंडीबैल विकून टाकली आणि महिना दोन महिने गांव सोडून गेला कुठंतरी. मोठा खुशरंग माणूस होता बेटा. हाडपेर लेकाचं चांगलं मजबूत होतं. रंग तमाशा सगळं जाणतो तो. अवंदा तो नव्हता तर होळी कशी सुनी सुनी वाटली .....

" दोन महिन्यांनी विठया परत आला. आणि नवल असं की एक दिवस ...महिनाहि झाला नाही पुरा—एक दिवस जुम्म्याच्या दिवशीं रात्रीं अकरा वाजतां त्याची नवरी—बायनी—माझ्या घरीं आली. मी जेऊन नुकतांच चिलीम पीत खाटेवर बसलों होतों. तिला पाहून दचकलोंच. तिच्या खांद्यावर एक लहान परी-सारखी मुलगी होती दोन अडीच महिन्यांची. तिनं माझ्याजवळ मुलगी दिली आणि मडक्यांतील दोन लोटे पाणी पहिले पिऊन टाकलं. मीं तिला कांही विचारण्याच्या अगोदरच तिने सांगायला सुरूवात केली—' रशीदबाबा! या गावांत हें पहिलं पाऊल तुझ्याच

दारांत ठेवलं. वर्षभर मी दुसऱ्याजवळ राहिल्यें. वाटलं त्याच्याजवळ जास्त सुख होईल. मोठा गोड बोलत असे तो. चांदण्यारात्रीं दूध पेढे खायला देई. या पोरीच्या वेळेस मला दिवस होते. आणि काय नशीब माझं, मी आपसुखं त्याच्याजवळ चालत गेल्याचं फळ मला मिळालं. तो जणुं मला आपली मोटारच समजला आणि माझं साजरेपण आणि जवानी विकायला मांडावयाचा विचार करूं लागला. जोंवर दुसरा इलाज नव्हता तोंवर बाईमाणसाच्या शक्तीनं त्याच्याशी झगडत भांडत बचावून राहिल्यें मी. दिवस जा म्हटल्या जाईनात. ही पोरगी झाली तेव्हा मोठा वाखा झाला माझा. पण दोन महिन्यापूर्वी विठ्या पुनः आला. गुपचुप येऊन भेटला. सर्व अपराध पोटांत घालतों म्हणाला. तुझ्याशीं चांगली नांदीन असा मीं हि त्याला शब्द दिला...

"पण रशीदबाबा! ही पोरगी--त्याला नको आहे. तो माझी जिम्मेदारी घ्यायला तयार आहे पण पोरीची याद कडु आहे म्हणतो. सगळं त्याला विसरतां येणार नाही. हिची व्यवस्था लागली तर आम्ही गांव सोडून निघून जाऊं. काय करूं या पोरीचं सांग—"

"आणि राजा, ती पोरगी माझ्या मांडीवर होती. ती मलाच बिलगली. माझी उमर, माझी ताकद, पैशाअधल्यांची कमजोरी सगळं कांही मी विसरलों आणि तिला सांगितलं कीं राहूं दे पोरगी माझ्याजवळ. संभाळीन मी तिला—

"तिनं एकवेळ पोरीला पाजलं आणि दहाची नोट माझ्याजवळ दिली. मीं ती फेकून तिचा कान धरला आणि दटावलं

तिला की रशीदमिया मेल्या आईचं दूध प्यालेला नाही. अझून दहा माणसांची कमाई करण्याची धमक त्याच्या अंगांत आहे.

"ती निघून गेली पोरीला ठेऊन. दुसऱ्या दिवशी विठयानं गांव सोडला. पोरगी माझ्याजवळ राहिली. चिंधीनं मी तिला बकरीचं दूध पाजीत असे. चोवीस घंटे सारखी अंगाखांद्यावर तिला खेळवीत होतों. रात्रीं तिला छातीशी घेऊन झोपीं जाई. एक क्षणभर सुद्धा तिला कधी विसंबलों नाही. तिच्यासाठी हे आंगडं शिवलं. सारी कलाकुसर खर्च केली. आंगडं घातलं की नर्गिसच्या फुला-सारखी दिसे पोरगी. नांवच तिचं मग मीं नर्गिस ठेवलं. तिच्यासाठी एक पोपट हि पोसला होता."...

रशीदमियांच्या तोंडून शब्द निघत ना. अंमळ थांबतांच त्यांचे डोळे भरून आले. प्रयासाने आंवढा गिळून त्यांनी पुढे सांगितलें—

"नंतर चार आठदिवसांतच कशी कुणास ठाऊक पण ही गोष्ट इथं कळली. तुमच्या जातीचीं चारदोन माणसं परगांवाहून आलीं इथं. त्यांनी इथल्या गांवकऱ्यांशी कांही मनसुभा केला व विठूच्या बायकोला आणून जबरदस्तीने त्यांनी पोरगी आपल्या ताब्यांत घेतली. बायनीची इच्छा नव्हती. तिला त्यांनी धाक दाखविला, दम दिला, कायदा सांगितला. मला चार शिव्या दिल्या—"या बांडुकल्याला आपली जात वाढवायची आहे म्हणून आमच्या पोरी पोसतो. नाही तर हिंमत काय साल्याची. ठोकला

पाहिजे चांगला. पोलिसांच्या ताब्यांत दिला पाहिजे".—काय नाही नाही ते बोलले. कमीन अवलादीचा, लफंगा, सर्व जें काय म्हणण्या-सारखं होतं तें म्हणून घेतलं. मीं त्यांचा एक शब्दहि उलटविला नाही. त्यांना सांगितलं, तुम्ही पोरीला चांगलं संभाळण्याचं वचन द्या व घेऊन जा. जातबीत तुम्हीच काढतां आणि मानतां. हिला कोणत्या जातीच्या हवालीं करणार तें सांगा व तिला जगवाल अशी तुमच्या देवाची शपथ घ्या--

" त्यांनी कांही एक मानलं नाही. ठेवली आहे पोरगी तुझ्या बापाने, असें म्हणून त्यांनी माझ्या हातून नर्गिसला हिसकावून घेतली आणि निघून गेले,

"त्या रात्रीं त्यांनी ती पोरगी शिवजीच्या घरीं ठेवली. विठूची बायको रातोरात निघून गेली होती. मी तडफडत रडत कुढत पहांटेची अजान † ऐकली. दुसऱ्या दिवशीं बकरी विकून टाकली. पोपट उडवून दिला, पोरीच्या अंगावरचं तें नवं आंगडंहि त्यांनी काढून फेकलं होतं तें उचलून ठेवलं. अझूनहि रात्रीं झोप येत नाही. खुदाकसम, उशी छातीशी घेऊन झोपतों नर्गिस नर्गिस करीत.—

" तिला नेलं त्याचं वाईट वाटलं नाही मला. चार दोन दिवसांत माझं मन ताळ्यावर आलं असतं. पण राजा, त्यांनी त्या पोरीची गति गति केली रे! तुमच्या जातींतल्या ज्या लोकांजवळ

† पहाटेच्या नमाजाची पुकार

अन्न-पाणी भरपूर होतं त्यांच्याजवळ ते गेले पण त्यांनी कुणी मुलगी ठेऊन घेतली नाही. मदत करतों म्हणाले. त्यांच्या समोर जातीचा प्रश्न येऊन उभा राहिला. दुसऱ्या दिवशीं त्यांनी ती मुलगी एका भिकारणीला दिली. तिच्या अंगावर पितं मूल होतं. दोघांना पुरेल इतकं भरपूर दूध तिला यावं म्हणून तिच्या खुराकीची व्यवस्था चार मंडळींनी अंगावर घेतली आणि रोज आठ आणे तिला दुधासाठी देण्याचें ठरविलें. पण या अल्ला ! ती भिकारीण माझ्या नर्गिसला रडत ठेवीत असे व आपल्याच मुलाला पाजी. तिला कसं समजविणार ? एक दिवस मीं तिला आठ आणे दिले पण त्याची तिनं दारू घेऊन पिऊन टाकली.

" पुढे तिला आठ आणेहि कुणी नियमित देईना. माझं मन तुटत असे. बायनी माझ्याकडे शुक्रवारीं आली होती. तिनं ज्या दिवशीं नर्गिसला टाकली त्याच दिवशी खुदानं माझ्या मनांत तिच्यासाठी जागा केली. माझ्या म्हाताऱ्याच्या घरांत सतार आली होती. माझं एकटं आयुष्य ..! राजा, तुला तर खुदानं आपल्या-सारखे नेक आईबाप दिले आहेत आणि तरी तुला मीं लहानपणीं माझं मन रमावं म्हणून सकाळपासून संध्याकाळपर्यंत खेळवलं आहे....

" माझं मन थांबेना. मी पुनः त्या शरीफ* माणसांकडे गेलों. त्यांना विनविलें कीं तुम्ही एक पैसा देऊं नका. मुलगी मला द्या.

* सभ्य माणूस

मी संभाळतों. माझे दिवस थकले आहेत. मोठी झाल्यावर तुम्ही हवें तर घेऊन जा. मी इमान करतों. पाहिजे तर माझी सही घ्या कागदावर...

"त्यांनी मात्र मला मुलगी दिली नाही. मोठी झाल्यावर तर त्यांना आणखीच पंचाईत पडली असती. चार शिव्या हासडून मला त्यांनी सांगितलें, "ती अशी मेली तरी चालेल पण ती तुझ्या जातींत राहून जगतां कामा नये. आपली जात बाढवितां आणि वर रहमदिलीच्या गोष्टी सांगतां ? तुम्हांला आता वेगळी जागा पाहिजे राहायला नाही कां ? त्या जागेंत राहायला आता बरेच लोक लागतील. तो तुमचा मुंबईचा बाप ओरडतोच आहे. जायचें असेल तर जा नरकांत कुठेहि, पण असा कावा आम्ही चालूं देणार नाही. खबरदार, हरामखोर—"

"मी त्यांच्या पायां पडलों. पदर पसरला पण त्यांनी काढून लावले.

"कांही दिवस मी रोज त्या भिकारणीला पैसे देत असे व माझ्या देखत नर्गिसला पाजून घेत असे. तथापि हें हि सुख माझ्या नशिबीं नव्हते. एक दिवस ती भिकारीणच बेपत्ता झाली. या थकलेल्या पायांनी मीं सतत आठ दिवस आसपासचीं गावें शोधलीं पण पत्ता लागला नाही. नर्गिस जगत असेल असें मला वाटत नाही. तिचं आंगडं पडलं आहे इथं वाऱ्यानं फडफडत. पोरगी मात्र मारली त्यांनी...

"अल्लाचे जीव जगविण्यांतहि आता तुमची व आमची जात यायला लागली. अनाथ अपंगांचा आसरा गेला. आणि खुदाच्या कामांत खलल* आला. आणि तुझ्यासारखीं शहाणींसुरतीं पोरं आता तोफेचे गोळे फेकून लाखों माणसें केवळ मारायलाच शिकत आहेत. मुंबईला म्हणे बाप आहे माझा. तिथल्या गोष्टी इथं रे कशाला ? आणि माझ्या बापाने मला कांही शिकविलं असेलच की नाही ?

"मला मात्र हें शिकायचं नाही म्हणूनच मी अल्लाला सारखा मागतों की बस्स् ! जाऊंदे मला इथून. तुमच्याकडून आता शहाणपण शिकायचं नाही मला. तुम्ही एक गोळा टाकतां आणि शेकडों मैलांवर त्याचा हादरा बसतो. ज्यांनी भरणपोषणाचीं कामें उचललीं आहेत ते मरतात आणि गोळा टाकणाऱ्याला मात्र दखल येत नाही. हें तुमचं शिक्षण आमच्या गावापर्यंत आलं आहे पण माझ्यापर्यंत त्याला मी येऊं देणार नाही. मला हादरा बसूं देणार नाही. टाका किती गोळे टाकतां तें. त्याच्या अगोदरच मी..."

"चल ऊठ. शिवजीनं बोलावलं आहे मला ना ? त्याच्या शेताची आज जागली करायची आहे...."

रशीदमियाने एका हाताने काठीचा व दुसऱ्या हाताने माझा आधार घेतला. तो साठ वर्षांचा महावृक्ष !

वर्धा, २-६-४६.

---

* बाधा, खंड, रोक.

## १२ पु न र्ज न्म*

आटपाट नगर होतें. त्या नगरावर निसर्गाची फार कृपा होती. गावाच्या अवती भवतीं उंच उंच टेकडया होत्या. पावसाळ्यांत त्या टेकडयांवर ढगाचे पुंजकेच्या पुंजके जमत, आणि ते टेकडयांशीं मनसोक्त खेळून आपलें सगळें पाणी त्यांना देऊन टाकीत. लागेल तेवढें पाणी स्वतःसाठी ठेऊन त्या टेकडया उरलेलें सर्व पाणी खाल-च्या तलावाला देत. लोकांना वर्षभर पुरेल इतकें पाणी तलाव पण आपल्या जवळ साठवून ठेवीत असे. त्या तलावांतून दोन छोटया छोटया नद्या वहात होत्या. आपल्या काठचा प्रदेश त्या सुपीक करीत पुढे जात. सुपीकतेमुळे लोकांना तृप्ति असे. जरासें खणलें की विहिरीला नवे झरे फुटत. जरासें ओलीत केलें की बागाईत येई. थोडयाशा उपयोगी शरीरश्रमांनीहि त्या गावांत समृद्धि होई. लोकांना असें वाटे की आपल्यासाठी पृथ्वी मातेने भरपूर अन्नपाणी साठविलें आहे. येवढेसे कष्ट करावयाचाच अवकाश की ताटभर अन्न सहज मिळेल. त्यामुळे लोकांना हाव नसे. ते

* पुनर्लिखित लोककथा.

बिनघोर असत. स्वतःला गांजीत नसत. शेतांतील नवतीची वानगी पाखरांनी चाखली तरी त्यांचें धान्य कमी होत नसे. कापणीला आलेल्या शेतांत चुकून एकादा गाईचा कळप गेला तरी मालकाला काठी उगारावीशी वाटत नसे. धरती मातेकडून भरपूर अन्नाचें आश्वासन ! नदीकडून भरपूर पाण्याचा पुरवठा !

लोकांचीं घरें स्वच्छ सारविलेलीं लिपलेलीं असत. रस्त्यावर घाण, केरकचरा यांचें नांव नसे. सकाळीं गाई म्हशी शिवारांत चरायला जात. त्यांचें शेण रस्त्याने पडलेलें दिसलें तर ज्याला दिसेल तो तें उचलून टाकी. ज्याच्या त्याच्या घरासमोरची घाण ज्याची त्याने च उचलून टाकली पाहिजे अशी अपेक्षा असली तरी नियम नव्हता. घाण दिसली की स्वच्छ करावयाची अशी तेथील रूढि होती. त्यामुळे टेकडीवरील वाटा आणि नदीकाठहि अगदी स्वच्छ असत. नदीच्या वाळवंटांतील मैदानांत स्त्रिया आपलीं रंगीबेरंगी लुगडीं वाळवीत. पाण्याच्या घागरी घासून पुसून चकचक ठेवीत. सकाळचे सूर्यकिरण त्यांतून आपलें रूप पहात. ऋतुमाना-प्रमाणे नदीच्या निर्मळ वाहत्या पाण्यांत टोपल्यांतून पेरलेलें गव्हाचें पिवळें वाण सोडीत. पावसाळा संपला की कार्तिकांत पुष्पदीप आणि वसंत ऋतूंत गुलालाच्या मुठीच्या मुठी !

प्रत्येक घरासमोर तुळशीचीं वृंदावनें होतीं. त्यांत सतेज लवलवणारीं श्यामल तुळशीचीं रोपें वाऱ्याबरोबर खेळत असत. वृंदावनांत सायंकाळीं तुपाची फुलवात लागे. वाऱ्याचें मंद मंद

वाहणें; पक्षांच्या थव्यांनी झाडें भरून आसमंत चिवचिवाटाने भरून जाणें; लोकांचें नेहमी उद्योगांत रत असणें; सायंकाळचें सर्वांचें विश्रामास्तव घरीं येणें; गाईगुरांच्या कळपाचें हंबरणें— सर्वच जणुं खूप थकलेले, निवाऱ्याला, आसऱ्याला घरीं आलेले!

सर्वांनी आपापल्या वाट्याचे कष्ट करावेत आणि सुखा-समाधानांत रहावें अशी त्या गावच्या देवतेची आज्ञा होती. ती तिने अनेक सत्पुरुषांच्या मुखाने व्यक्त केली होती. त्या बाबतींत गावदेवी डोळ्यांत तेल घालून जपत असते असा वयोवृद्धांचा अनुभव होता. कुणी कुणाच्या वाट्याचे श्रम करून इतरांना फुकटचें खाऊं घालतां कामा नये. उलट सर्वांनी खपावें, आपला वाटा मिळवावा, त्याचा आनंदाने उपभोग घ्यावा, सर्वत्र तृप्ति असावी, या गोष्टीवर देवतेचा कटाक्ष असे.

कित्येक वर्षेंपर्यंत ही व्यवस्था त्या गावांत सुरू होती. तरुण स्त्रिया फुलझाडांना पाणी घालीत आणि फुलांच्या शेजेवर झोपत. तरुण पुरुष फळझाडांची जोपासना करीत आणि सरस, मधुर फळें स्वतः खात, आपल्या प्रियमाणसांना देत. गाईची सेवा करीत आणि दूध तूप भरपूर खात.

अशा त्या सुंदर आणि सुखी गावांत एकदा एक नवलपूर्ण गोष्ट घडली. ज्या गोष्टीचा कधी प्रत्यय नव्हता त्या गोष्टीचा प्रत्यय येणार की काय अशी भीति पडली म्हणून......

ऐका ऐका श्रोतृवृंदांनो, महाशिवरात्रीची कहाणी. शंकर पार्वतीची कहाणी.

त्या गावांत एक दिवस एक शेतकरी आला आणि त्याने तेथे आपली वस्ती केली. तो अतिशय कष्टाळू होता. प्रातःकाळच्या सूर्यकिरणांनी त्याला कधी बिछान्यावर पाहिलें नाही. सायंकाळीं मावळतीला काळोख पडल्यावाचून तो कधी शेतांतून परतला नाही. दिवसभर काम, रात्रभर आराम. पहाटे उठावें. देवाचें नांव घ्यावें. आपली बैलजोडी घेऊन चालूं लागावें. सायंकाळीं परतावें. बैलांना दाणापाणी द्यावें. आणि कोरडी भाकर लोटाभर पाण्याने पोटांत ढकलून पथारी जवळ करावी. हा त्याचा नित्य नेम असे. कधी त्याचा क्रम बदलला नाही. कधी त्याचे श्रम कमी पडले नाहीत. कधी त्याची कोरडी भाकर सुटली नाही. त्याच्या शेतांत कमी पिकलें तर त्याला कधी पोट मारावें लागलें नाही. जास्त आणि तऱ्हेतऱ्हेचें पिकलें तरी त्याने त्याचा कधी उपभोग घेतला नाही. येवढेंच काय, पण तेलातुपाचें चोपडपणहि त्याने आपल्या भाकरीला कधी लाविलें नाही.

प्रथम त्याने मोठ्या कष्टाने जमिनीची एक लहान पट्टी मिळविली. गादलेली, उस्तवारी न केलेली अशी. पण रोज रोज त्याची कुदळ आंत खुपसूं लागली. काळी ताजी कसदार माती वर आली. चादरीसारखें शेत स्वच्छ झालें. आणि त्या गावची ती जमीन! मग काय विचारावयाचें! पावसाचा पहिला शिरवा आला. त्या नव्या जमिनीने थेंबन् थेंब पिऊन टाकला. दुसरा शिरवा आला. जमीन भिजून तर्रर झाली. शेतकऱ्याने बीं फेकलें. काळ्या जमिनींत अंकुर फुटले. मनांतील आशाप्रमाणें वाऱ्याने हलत डुलत ते मोठे

झाले. फुलें आलीं. कणसें आलीं. ओंब्या आल्या. धरणीने हजारों मुठी भरून सोनें वाटलें. सोन्याचा मोठा ढीग जणुं खळयावर जमला आहे, असें तें धान्य पाहून वाटलें!

कष्ट केलेल्या शेतकऱ्याची पत्नी म्हणाली—"देवाने कृपा केली. एक गाय घ्या. दुधातुपाला आसरा होईल. शेणखत घरीं पडेल." पण त्याच्या मनांत तें भरलें नाही. घरीं भाकरीपुरतें धान्य ठेऊन त्याने सर्व विकून टाकलें. आणि दुसरा जमिनीचा तुकडा विकत घेतला.

एक शेत झालें. दुसरें झालें. तिसरें झालें. सुंदर शेत, सुंदर फुलवाडी, सुंदर मळा, सुंदर बाग. जो कष्ट करील त्याच्या उपभोगासाठी अनंत हस्ताने त्याचें माप टाकायचें वचन ईश्वराने दिलें आहे. शेतकऱ्याच्या कष्टांना सीमा नव्हती. पण त्याने ईश्वराच्या देणगीचा स्वीकार करूनहि कोरडी भाकरच खाल्ली.

आणखी धान्य पिकलें. आणखी द्रव्य सांचलें. त्याचें काय करायचें? त्याच्या बरोबरीने कष्ट केलेल्या बैलांनी त्या राशीकडे पाहिलें व तशीच नजर शेतकऱ्याकडे वळविली. जणु त्यांना म्हणायचें होतें—" धनी, तुझ्या बरोबर राबलों. रात्र म्हटली नाही. दिवस म्हटला नाही. कधी थकून अडलों नाही. नाठाळपणा केला नाही. आणि हें आपल्या दोघांच्या कमाईचें समोर पडलें आहे. आम्हांला चांगले कासरे घे. आमच्या गळयांत सुंदर पट्टे घाल. गळयांतील घुंगुरें चांगलीं वाजूं देत. तूं आपल्यासाठीहि चांगलें आंगडें घे,

पागोटें घे, चार दिवस विश्रांति घे. तुझें शरीर राबलें आहे, थकलें आहे. त्याचा कोंडा पडतो आहे. त्याला तेलाचा हात लाव. ईश्वराने जसें दिलें तसें राबवूं नकोस. तूं आपल्याकडूनहि त्याचें जतन कर, त्याचें वैभव वाढव. त्यांत देवालाहि संतोष होईल. कढत पाण्याने आंघोळ कर. मऊ वाकळीवर अंग टाक........."

पण शेतकरी दुसरीकडे नजर वळवितो असें दिसतांच बैलांनी बोलणें बंद केलें.

तथापि आज त्याला सर्वांनीच छेडण्याचा जणुं कट केला होता. सकाळीं घरधनिणीने त्याच्या भाकरीवर लोण्याचा गोळा टाकला. तो त्याने काढून ठेवला होता. तिचें मन दुखलें होतें. जीवाला गांजल्या-बद्दल तिने त्याला दोष दिला होता. घरीं सर्व असून कोरड्या भाकरीशिवाय स्वतःला कांहीहि आरजूं न देण्याबद्दल त्याचा जो कटाक्ष होता तो सोडण्यासाठी तिने डोळ्यांत पाणी आणून त्याला सांगून पाहिलें होतें. पण एक ना दोन. त्याने कांहीच ऐकलें नाही. दुपारीं तो बागेंत गेला. सुरुवातीला प्रवेशद्वाराजवळच पपईचीं झाडें फळांनी भारावलीं होतीं. ज्याने खतपाणी घालून आपल्याला येवढें मोठें केलें त्याच्याबद्दलच्या कृतज्ञतेने तीं जणुं लवलीं होतीं. त्यांतील एक झाड अधिकच लवलें, व पिकलेली एक पपई त्याने शेतकऱ्याच्या पायाजवळ टाकली आणि जणुं सांगितलें—"आमची ही नम्र भेट; येवढेंच आम्ही तुझ्यासाठी करूं शकतों. त्याचा स्वीकार कर. तुझ्या जीवाची तृप्ति होईल आणि आमचीं फळें अधिक पिकतील. घे—"

पण ती पपई उचलून त्याने नोकराबरोबर बाजारांत विकायला पाठवून दिली. पुढे गेला. संन्याचीं झाडें पाचूं आणि सोन्याच्या रंगाच्या फळांनी जणुं मढलेलीं होतीं. वारा आला. सुगंध पसरवून गेला. झाडापासून संकेत घेऊन त्याने सुंदर, पिकलेलीं संत्रीं खाली टाकलीं. केळबनांतील सुंदर पिकून फुटलेले केळयाचे घडहि शेत-ऱ्याला सांगते झाले की, "हें तुझ्यासाठी आहे. इतरांना पुष्कळ मिळालेलें आहे. आता तुझाच वाटा राहिला आहे. यांतलें कांही तरी तुझ्या अंगीं लागूं दे."

पण लवलेल्या पानांची नम्र प्रार्थनाहि त्याने ऐकली नाही. सर्व फळें उचलून बाजारांत पाठविलीं. फळांचीं तोंडें खरकन् उतरलीं. झाडें खिन्न झालीं. त्यांनी माना टाकल्या. पानें खालीं गळालीं.

पुनः पैसा साठला. पुनः शेत घेतलें गेलें. जमिनीचे पट्टेच्या पट्टे, चादरीच्या चादरी. त्याच्या कष्टाचीं फळें इतर सर्वांना मिळालीं. त्याच्या मात्र कोणत्याहि कार्यक्रमांत बदल झाला नाही. मातीच्या खापरांतील कोरडी भाकरच नित्याची त्याच्या पोटांत जात होती. त्याचा अंतरात्मा त्याला शक्ति देत होता. शरीराचे व्यापार त्याच्या इच्छेप्रमाणें करूं देत होता. जें जें तो करील त्यांत यशहि मिळत होतें. त्याने मात्र अंतरात्म्याला कांहीच दिलें नव्हतें. त्याच्या घरीं तेलातुपाच्या घागरी भरल्या जात होत्या; पण ज्या अन्नाला पूर्ण-ब्रह्म म्हटलेलें आहे त्याची अंतरात्म्याला पडणारी आहुती कोरडीच पडत होती.

इतकें असूनहि आजवर अंतरात्मा—त्याचा जीव—सर्व कांही सहनच करीत गेला. आपल्यांतील स्नेहाने शेतकऱ्याचें शरीर तो टिकवीतच गेला. शेतकऱ्याला आज वाटेल, उद्या बुद्धि होईल, अशी वाट पहात तो दिवसाची रात्र व रात्रीचा दिवस करीत होता.

मधून मधून मात्र त्या जीवाला वाटे, "आत्मपीडन हें असुरांचें काम. हा सर्व कृति माणसासारखी करतो. सर्व सद्‌गुण याच्यांत आहेत. भुकलेल्याला हा भाकर देतो. चुकलेल्याला कठोर बोलत नाही. इतरांच्या कमावलेल्या चिजेला कधी स्पर्श करीत नाही. देवाचें नांव घेतल्याशिवाय अंथरुणाला पाठ लावीत नाही. कधी खोटें बोलत नाही. उणें दुणें तोंडावाटे काढत नाही. कोणाच्या अध्यांत नाही, मध्यांत नाही. आचार विचार सर्व मानवासारखे आहेत. आणि तरीहि हें देहधातूचें शोषण याच्या हातून कां व कसें घडतें ? ही सवय याला कां व कशी लागली ? हा असेंच करीत राहिला तर जगण्याचा हक्क तरी याला कां मिळत रहावा ? याच्या अतिश्रमांनी इतरांचे श्रम वाचतील. अन्न उत्पन्न करायला इतरांना कष्ट करावे लागणार नाहीत. ते ऐतखाऊ आणि आळशी बनतील. हळु हळु तसे बनण्याचा त्यांचा हक्क ते शाबित करूं लागतील. असा हक्क सांगणाऱ्यांची एक जातच बनेल. आणि कष्टांत खर्च न झालेली आपली सर्व शक्ति ते असली परपुष्ट जीवन राहणी सतत टिकविण्याचा खटाटोप करण्यांत खर्च करतील. हा शेतकरी कष्टच करीत राहील. आज त्याच्याजवळ सर्व आहे. उद्या तें हि राहणार नाही. आज कोरडी भाकर तरी आहे. उद्या ही देखील

त्याला मागूनच खावी लागेल. एक वेळ गुरें सुखांत राहतील, कुत्र्या मांजरांना दूधतूप मिळेल, पोपट मैनांना मेवामिठाई चारली जाईल; परंतु हा मात्र कष्टाचा, केवळ कष्टाचाच धनी होऊन बसेल......

" छे, छे याला जगूं देण्यांत याचेंच नुकसान आहे. हा रोज आत्महत्या करतो तीच योग्य. याचें पोषण होऊं देण्यांत अर्थ नाही. याच्या मृत्यूंत याचें आणि याच्या जातीचें कल्याण आहे........."

जीवाचा अखेर निश्चय झाला. जीवाने शिवाला जाऊन सांगितलें. शिव म्हणजे संहाराची शक्ति. कल्याणास्तव संहार करणारा तो महादेवजी ! शिवाने जीवाचें म्हणणें शांतपणें ऐकून घेतलें आणि 'तथास्तु' म्हणणार तोच.........

जगन्मातेने तो शब्द तोंडांतून निघूं दिला नाही. ती म्हणजे जगाचें धारण करणारी, चुकल्यामाकल्यांना संभाळून नेणारी. ती शिक्षा करील पण आईच्या हाताने. ती वाईट इच्छील पण मातेच्या हृदयाने. म्हणूनच ती जगन्माऊली—

शिवाला संहाराची काळजी लागली. जगदंबेला उद्धाराची !

इकडे काय झालें ? महाशिवरात्रीचें नवरात्र आलें. शंकराची मंगलमय आराधना करण्याची पर्वणी आली. शंकराच्या दर्शनाला मेळे निघाले. दऱ्याकपारींतून रानाडोंगरांतून—' हर बोला, हर हर

महादेऽऽव 'चा निनाद उठला. अत्यंत बिकट अशा रानाच्या मध्यभागीं ध्यानस्थ बसलेल्या शिवाचें दर्शन घेण्यासाठी भक्तजन निघाले. रस्ते कठिण होते. काट्यागोट्यांनी भरलेले होते. कोस कोस भर पाण्याचा पत्ता नव्हता. डोळ्यांना सर्व विपरीत दिसत होतें. पण भक्तीच्या डोळ्यांना सर्वत्र मंगलाचा साक्षात्कार होता होता. ठिकाण निर्जळ असायचें पण—

" महादेवीं जातां घोटा घोटा पाणी
बैल लागले पोहणी हर बोला···"

असा चमत्कार शिवाच्या दर्शनास जाणाऱ्यांना भासायचा. तिथे दगड धोंड्याशिवाय कांही सुद्धा दिसूं नये पण—

" महादेवीं जातां सोन्याचें गंगाळ
त्यांत सांबाची आंघोळ हर बोला···"

होत असल्याचा प्रत्यय यावा. भक्तांचा सोहळा अशा थाटाने निघाला होता की जणुं त्या उजाड नि दुर्गम वाटा समृद्धीचे राज-रस्ते बनलेल्या होत्या.

नवरात्राच्या दुसऱ्या दिवशीं शेतकऱ्याच्या दाराशी अगदी सकाळीं एक यात्रेकरू येऊन उभा राहिला. नाजुक देहयष्टि, नितळ रंग, सात्विक चेहरा. कपाळीं कुंकवाचा पट्टा लाविलेला आहे. हातीं त्रिशूळ आहे. मुखीं शंकराचें नांव आहे.

शेतकऱ्याच्या कानावर नामजप पडला. त्याने यात्रेकरूला आदराने बोलाविलें. बसविलें. यात्रेकरू म्हणाला—" भल्या माणसा,

जीवाचें सार्थक करण्याची वेळ आली आहे. शंकराच्या दर्शनासाठी 'पोहा' निघालेला आहे. आपलीं कामें रोजचींच आहेत. तीं साधतां येतील. पर्वणी मात्र साधली जाणार नाही. चल, ऊठ, दर्शनाला जाऊं. महादेवाचा प्रसाद घेऊं. जन्माला आल्याचें सार्थक करूं. देह आणि मन कारणीं लागेल."

यात्रेकरूच्या दृष्टींत जणुं दूध भरलें होतें. बोलण्यांत अमृत होतें. स्पर्शांत जणुं आईचा साक्षात्कार होत होता. मृगाचे ढग येऊन मन प्रसन्न व्हावें तसें काहींसें शेतकऱ्याला झालें होतें. जन्मोजन्मीचें त्याचें शुभसंचित जणुं जागें झालें आणि शेतकरी यात्रेच्या तयारीला लागला.

तथापि त्याच्या 'जीवाला' चुटपुट लागली. तो विचार करूं लागला की शेतकऱ्याचें जर असें कल्याण झालें तर यांत शुभ नाही. याची जीवनराहणी त्यामुळे आदर्श होऊन बसेल आणि इतरांच्या आळसालाहि भलें स्वरूप येईल. तसें होतां कामा नये, अगदी नये!

शेतकऱ्याची तयारी झाली. यात्रेकरू निघाले. मजल दरमजल रस्ता जवळ येऊं लागला. काटेगोटे भासले नाहीत. संकटें जाणवलीं नाहीत.

चवथा दिवस उजाडला. वाट चालून चालून शेतकरी थकला. दोघेहि प्रवाशी एका विशाल वृक्षाच्या सघन छायेखाली आश्रयाला आले. दोघांनी आपापल्या शिदोऱ्या सोडल्या. शेतकऱ्याने कोरडी भाकर पाण्याबरोबर ढकलली आणि ते झोपले.

पहाट फुटली. पांखरें जागीं झालीं. प्रकाशाचे किरण सर्वत्र पसरले. पण शेतकरी जागा झाला नाही. त्याचा साथीदार त्याला हाक मारूं लागला—

"बाबारे, ऊठ, पुष्कळ दूर जायचें आहे. वाट पुष्कळ संपवायची आहे, चल."

शेतकरी उठला नाही. कसलीहि हालचाल नाही.

साथीदाराने पुनः हाक मारली, "शेतकऱ्या, ऊठ. शिवरात्रीला शंकराचें दर्शन घ्यावयाचें आहे. झोपायला वेळ नाही."

शेतकरी उठला नाही. कसलीहि हालचाल नाही !

साथीदाराने पुनः हाक मारली "मित्रा, आज तुला काय झालें ? तुला सुखरूप तुझ्या घरीं पोचविण्याचें मी तुझ्या घरधणिनीला कबूल केलें आहे. पतिव्रतेला सौभाग्याचा आशिर्वाद दिलेला आहे. माझा शब्द माझ्या प्राणापेक्षा मीं नेहमीच जास्त मानला आहे. ऊठ."

शेतकरी जागा झाला नाही. बोलला नाही. कसलीहि हाल-चाल नाही.

पण हालचाल वर वृक्षावर झाली. झाडाच्या फांद्या हालल्या. झाडावरून शब्द आले—"हे प्रवाशा, तूं शेतकऱ्याची वाट पाहूं नकोस. तुला वेळ होईल. तूं शंकराच्या दर्शनाला निघून जा. शेतकरी उठायचा नाही."

प्रवाशाने वर पाहिलें. आकृति दिसेना. शब्द येत होता. फांद्या हालत होत्या. त्याने विचारलें.

"तूं कोण आहेस ?"

"मी ? मी शेतकऱ्याचा जीव. मी त्याच्या देहाला सोडून शिवाकडे जातों आहें. त्याचा देह आता इथेच पडून राहील. तूं आपल्या प्रवासाला लाग."

"तसें होणार नाही. शिवाचें नवरात्र आहे. त्याचा प्राण जाणें शक्य नाही. तरी तूं याच्या देहाचा त्याग कां केलास ? याने काय अपराध केला ?"

"याने अनंत अपराध केलेले आहेत. आणि म्हणून याचें कल्याण झालेलें जगाला दिसतां कामा नये."

"याने कोणते अपराध केले ? गाय मारली ?"

"नाही."

"ब्रह्महत्या केली ?"

"नाही."

"परस्त्रीच्या ठिकाणीं वासना धरली ?"

"नाही."

"मग याने महान अपराध तो काय केला ?"

"हा राबला. नुसताच राबला. जनावरांपेक्षा याने जास्त कष्ट केले आणि माझी गांजणूक केली."

"म्हणजे ?"

"याला हा सुंदर, दुर्लभ असा मानवदेह मिळाला. मी त्यांत राहिलों, पण याने मला कधी नीट खाऊं पिऊं घातलें नाही. सतत गांजलें. कष्ट करायला सुरुवात केली तेव्हापासून याने काल खाल्ली तशी कोरडी भाकरच मला चारली. मीं सर्व बाबतींत याला यश दिलें. पण याने कधी मला तृप्त केलें नाही. म्हणून याला जगूं द्यायचें नाही. यांत त्याच्या जातीचें कल्याण आहे. सबब हे प्रवाशा, तूं इथून जा. आणि शंकराचें दर्शन घे. तुझा प्रवास सुखाचा होईल."

"जीवा, तूं ईश्वराचा अंश आहेस, तुला मी वंदन करतों. आणि विनवून तुझी करुणा भाकतों. मी शंकराच्या दर्शनाला जात आहें. एक शब्दहि अनाठायीं बोलणार नाही. शेतकऱ्याच्या पत्नीला मीं सौभाग्याचा आशीर्वाद दिलेला आहे आणि त्याला सुखरूप घरीं पोचविण्याचें वचन दिलें आहे. तें वचन प्राण असेंपर्यंत मी पाळीन. तुला शेतकऱ्याच्या शरीरांत प्रवेश करावयाचा नसेल तर माझेहि प्राण घेऊन जा. मी इथून जाणें शक्य नाही."

"तें कसें शक्य आहे ? माझी गांजणूक मला असह्य झालेली आहे. असुरांनी देखील मला इतकें छळलें नसतें."

" आता यापुढे तसें होणार नाही याची काळजी मी घेतों. महादेवजींची शपथ आहे. शिवाय याचा काळ आला नाही. भक्तांचा संहार देव करीत नाही. साध्वीच्या सौभाग्याकरितां तरी तूं पुनः या देहांत प्रवेश कर."

" याने माझी गांजणूक करतां कामा नये."

" कबूल."

" याने मला अतृप्त ठेवतां कामा नये."

" कबूल."

" याने आपल्या कष्टांच्या फळाचा योग्य वाटा स्वतःसाठी ठेवायाला हवा."

" हेंहि कबूल ! हे प्रभूच्या अंशा ! तूं फक्त एकदांच याच्या देहांत प्रवेश कर."

" तथास्तु " असा शब्द उमटला व इकडे शेतकरी झाडाखाली खडबडून जागा झाला !

" मित्रा, किती उशीर झाला. निघालें पाहिजे."

" होय, चला. तुझ्याचमुळे झाला उशीर. आजपासून आपल्याला उपवास. तो आता एकदम मुक्कामींच सुटेल."

" चला ! हर बोला हरहर महादेऽऽव."

प्रवाशाने जें घडलें तें शेतकऱ्याला सांगितलें. जंगलाची कठिण वाट संपत आली. हातापायाचा थकवा नाहीसा झाला. काट्यागोट्यांनी झालेल्या जखमा बऱ्या झाल्या. मन हरखलें. पांखरांची गायकी सुरू झाली. वाऱ्याने आपली गति सुखद अशी केली. फुलांचा सुगंध दरवळला. झाडावर फळांचे घोस दिसूं लागले. फुलांचा पाऊस पडूं लागला. तरुपर्णें शिवाशिवीचा खेळ खेळूं लागलीं. असें वाटलें, सर्वत्र

मंगल, सर्वत्र कल्याण व्यापून राहिलें आहे. कारण शंकरजीचें देवालय जवळ जवळ येऊं लागलें होतें.

भक्तांचा जयघोष कानीं आला. मंदिराच्या पायऱ्या भक्तांच्या देहाच्या पायघड्यांनी आच्छादित झाल्या. सर्वत्र नामाचा गजर—
" हर बोला हरहर महादेऽऽव "

शंकरजीचें दर्शन झालें. शेतकऱ्याने शिवाच्या मूर्तीला घट्ट कवटाळून धरलें. अंतःकरण उजळलें. तम गेला आणि प्रकाश आला. सत्त्व जागलें.

भक्तगण परतला. घरीं जावयाचें. सर्वांना मंगल पोचवायचें. सर्वांचें मंगल करावयाचें !

पारण्याचा दिवस आला. आत्मारामाची तृप्ती करावयाची. यथासांग नैवेद्य शंकरजीला अर्पण करावयाचा. शेतकरी घरीं पोचला. शेतकऱ्याच्या पत्नीने त्याच्या व यात्रेकरूंच्या पायाची धूळ आपल्या माथीं लावली.

"बाई, आज पारणें सुटावयाचें आहे. जें जें अनुकूल असेल त्याचा उपयोग करून पाकसिद्धि करा. आज तुमच्या पतीचा अनेक वर्षांपासूनचा उपवास सुटावयाचा आहे. त्याच्या हृदयांत ईश्वराने प्रवेश केलेला आहे. ईश्वराची तृप्ति होण्यालायक जें जें अर्पण करायला असेल तें तें आणा."

"करत्यें. सर्व पाकसिद्धि करत्यें. आज तुमच्या रूपाने माझ्या घरीं जगदंबा आली आहे."

# पु न र्ज न्म

पारण्याचा तो थाट ! गाईंनी भराभर दूध दिलें. बागेंतील झाडांनी मधुर रसदार फळें दिलीं. पंचपक्वान्नांची सिद्धता झाली. नैवेद्य वाढला गेला.

शंकराला नैवेद्य अर्पण करून शेतकऱ्यानें षड्रसयुक्त भोजन केलें. आपल्या कष्टाच्या फळांचा योग्य वाटा घेण्याची त्याने शपथ घेतली.

सर्वत्र तृप्तीची, साफल्याची मंगलभावना पसरली !

अंतरात्मा शांत झाला !

आमची गोष्ट सरो ! तुमचें आमचें पोट भरो !

वर्धा, २३-२-४६.

## १३ तीन शें दोन

'कर नाही त्याला डर नाही' असें म्हणतात. पण कांही एक न करतांहि आमच्या बॅरकमध्ये पाणी भरून जाणाऱ्या त्या कैद्याचा मात्र आम्हांला वचकच वाटायचा. त्याच्या कैदी होण्याला आम्ही खासच जबाबदार नव्हतों, हें एक आणि त्या ठिकाणीं आमच्या जीवाला तो कांही इजा करूं शकत नव्हता हें दुसरें. पण भीति शेवटपर्यंत मात्र वाटत राहिलीच.

तो आलाच मुळी अशा थाटांत की आल्या दिवसापासून त्याचें येणें सर्वांना जाणवलें. एकतर तो अतिशय तरुण होता. वीस वर्षांचेंहि त्याचें पुरतें वय होतेंसें दिसत नव्हतें. त्याची आंगकाठी अत्यंत सुडौल, पिळदार अशी होती. चित्रांमधूनहि इतकी चांगली शरीराची ठेवण आम्ही पाहिली नव्हती. ग्रीकांच्या वेळचे पुतळे दिसतात तसें त्याचें शरीर दिसे. रुंद खांदे, एखाद्या भक्कम मजबूत ढालेसारखी छाती. एवढीशी जरी वस्तु हाताने इकडे तिकडे हाल-विली तरी दंडांत चढून येणारे गोळे. स्नायूंचा पूर्ण विकास—या सर्वांमुळे त्याच्याकडे पहावेसेंच वाटे. तीन पिप्यांची कावड घेऊन बॅरकमध्ये शिरायचा तोहि अशा आविर्भावांत की जणुं सर्वांवर

स्वामित्व गाजवायलाच तो आंत शिरत आहे. दैन्य, लाचारी, बंदिस्त जीवनाची लाज यांचा त्याच्या ठिकाणीं मागमूसहि नव्हता. त्याचा निर्भीक, निडर चेहरा हाच आमच्यापैकी कित्येकांना बोचत असे. आम्ही अशी कल्पना करून बसलों होतों की हा तुरुंगवास जो आम्ही पत्करिला तो अत्यंत अनुपम अशा ध्येयदृष्टीने प्रेरित होऊन; हा त्याग जो आम्ही केला त्यापुढे सर्वांनी अगदी दिपलें पाहिजे. आम्हांला पहातांच विंचवानेहि आपली नांगी टाकायला हवी; त्यागाचा उन्माद आणि नशा आमच्यावर इतका चढला होता की ज्या ज्या कृतींत किंवा व्यक्तींत आमच्याबद्दल मोठेपणाची भावना दिसणार नाही ती कृति आणि व्यक्ति जगांत रहायला नालायक असें आम्ही समजत असूं. आम्हाला मिळणाऱ्या भाकरींत येवढासा ज्वारीचा दाणाहि सांपडला तरी आमच्यापैकी कित्येक अन्नसत्याग्रह करूं जात. आम्हांला भाकरी खराब मिळते म्हणजे काय? वस्तुस्थिति अशी होती की आमच्या घरच्या स्थितीला आणि संस्कृतीला ज्वारीचा दाणाच काय पण मूठभर खडेहि चालू शकत होते.

सबब अशा नाजुक देशभक्तांच्या या बॅरकमध्ये या पाणीवाल्या कैद्याने यावें आणि सिंहासारखी निर्भय नजर सर्वत्र फेकावी म्हणजे केवढी उपेक्षा आमची!

१९४२चे दिवस होते. जीं वर्तमानपत्रें वाचायला मिळत त्यांतून देशभर लूटमार, मोडतोड, जाळपोळ होत असल्याच्या बातम्या येत. इतर उद्योग नसल्याने आमच्या इथे शब्दांचींच वादळें

उठत. " गांधींनी 'करा किंवा मरा' चा संदेश दिला. लोकांना मरायचें नव्हतें म्हणून त्यांनी कृति केली. आता या हिंसेची जबाबदारी टाळतां येणार नाही." असें म्हणून कांही प्रतिपक्षाला दूषणें लावीत. कांहीचें अंतःकरण देशांत घडणाऱ्या हिंसेमुळे अहिंसेसाठी तिळानेच काय पण अगदी गव्हागव्हाने तुटत होतें आणि जेवणाची घंटा होईतोवर त्यांच्या वेदनांना विशेष कळा लागत असत. " जो सांगतो त्याने सर्व परिणामांची कल्पना करूनच सांगितलें पाहिजे आणि सर्व फळाची जोखीम पत्करली पाहिजे," असा सर्व चर्चेचा निष्कर्ष निघत असे.

एक दिवस हा पाणीवाला कैदी आमचें भांडण अगदी लक्षपूर्वक ऐकत होता. नुकताच चहाफराळ झाल्याने आम्हांला विशेष जोम आला होता. त्या कैद्यालाहि कांही बोलण्याचा उमाळा मधून मधून येतोसा दिसत होता. एक दोनदां तो कांही पुटपुटलाहि. पण वेदाचा अर्थ सांगण्याचा अर्थ फक्त ब्राह्मणांचा, शूद्रांचा नव्हे ! कांहीनी त्याची शिकायत करण्याचा धाक दाखवून त्याला पिटाळून लावलें.

दुसऱ्या दिवशीं मात्र तो कांहीशा तयारीनेच आला. आपली कावड त्याने सर्वांच्या अगोदर आणली. उद्देश असा की इतर कैद्यांचें येऊन पाणी भरून होई तोंवर त्याला वेळ मिळावा. त्यानें कावड ठेवली. वार्डर इतर पाणीवाल्यांच्या मागे आहे असें पाहून एक समाधानाचा सुस्कारा सोडला आणि अगदी निःसंकोच भावाने तो माझ्या बर्थवर येऊन बसला. मी वरमून त्याच्याकडे पहातच

राहिलों. माझ्याकडे न पाहतां त्यानें प्रथम माझ्या सर्व वस्तु न्याहाळल्या. जवळच्या खुर्चीवर माझा लंगोट वाळत होता. त्याकडे पहात त्याने अगदी सहज विचारलें:—

" काय भाऊ! जेलाच्या अगोदरपासूनच तुम्हांला कसरतीचा शौक दिसतोय. किती जोर काढतां, पांचशे ? चांगलं कमावलं आहे शरीर तुम्ही. उंची हि आहे तुम्हांला. जोड मात्र दिढीचा लागेल. दंगलांत खेळलां तर दुपटीच्या जोडीदाराबरोबर कुस्ती खेळावी लागेल तुम्हांला."

काय बोलावें हें मला सुचेना. कांही वेळाने जरा सावरून आणि देशभक्ति विसरून मी त्याच्याशी बोलण्याच्या अवसानांत आलों.

" काय, काय म्हणालास तूं ? "

" कांही नाही, शरीर चांगलं कमावलंय् तुम्ही. मर्दासारखे दिसतां."

" आणि तुझं काय वाईट आहेरे ? तुझ्यासारखी काठी तर शंभरांत एखादीच सापडेल."

" छे हो, इथं काय टिकतंय आतां या सुक्या भाकरीवर ?"

" तुझं नांव कायरे ?

" तीनशें दोन. "

" अरे, नंबर नाही, नांव ? "

" या सहा महिन्यांत नांवाचं कामच पडलं नाही. माझं नांव वाल्ू आहे. "

" कशांत आलारे ? "

" डाक्यामध्ये "

पण हें संभाषण तितकेंच राहिलें कारण वार्डरची नजर त्याच्यावर गेली आणि कावड घेऊन वाल्ूने धूम ठोकली.

दुसऱ्या दिवशींहि असाच तो आला. माझ्या शेजाऱ्याच्या ओटयाजवळील शेल्फवर विडीचा कट्टा होता. त्यांतली एक विडी अगदी सहजगत्या त्याने काढली व आगपेटी घेऊन मजेंत शिलगाविली. कुणाला विचारण्याची त्याला आवश्यकता हि वाटली नाही. चार दोन झुरके त्याने घाईंतच मारले आणि शेल्फवर ठेवलेली साबणाची वडी कुणालाहि न विचारतां उचलून तो चालायला लागला.

ज्याचें ज्याचें लक्ष त्याच्याकडे होतें त्या सर्वांनी अगदी निर्ढावलेला, चोर, डांबीस म्हणून त्यांची संभावना केली.

तथापि त्याच्याशीं कसें वागावें हें आता मला समजलें होतें. म्हणून दुसऱ्या दिवशीं जेव्हा तो आला तेव्हा मीं आपणहून त्याला जवळची सिगरेट दिली आणि म्हटलें—

"अरे, वाल्ं, तूं परवापासून त्या लंगोटाकडे सारखा पाहतो आहेस. तुला त्याची गरज दिसते. घेऊन जा तूं."

तो माझ्याकडे पहातच राहिला. कांही वेळाने लंगोट उचलत कांहीसें हसून म्हणाला, " गरज तर होती बाबू, पण तुमचं हाडपेर मजबूत पाहिलं अन् हिय्या झाला नाहीं उचलायचा. "

" मग त्या गृहस्थाची साबणाची वडी कशी उचललीस रे ? "

" बाबू! ते आपलं काय करणार आहेत बिचार ? नुसता हात धरून ठेवला तरी त्यांच्यानं सोडवून व्हायचा नाही."

" पण अशी बिनदिक्कत वस्तू उचलण्याची कांही लाज तरी ? ही चोरी ठरते ना बेटया ?"

" ठरली म्हणून काय झालं ? म्हणून चोरी थोडीच होणार ती ? अन् बाबू, बाहेर चोरी केली म्हणून इथं आलों. आतां इथं चोरी केल्यानं आणखी कुठं नेतील मसणांत ? इथंच ठेवतील. पाहिजे तर हें काम काढून घेतील व दुसरं देतील. चोरीबिरी कांही नाही. आपल्याला गरज लागली, समोर वस्तु दिसली, उचलली, झालं. त्या साबणानं शेटजीचे कपडे स्वच्छ होतील आणि आमचे काय मळतील ? जाऊं द्या हो, दुसऱ्या गोष्टी काढा. तुम्ही कुस्त्यांच्या दंगलांत कधी कुणाला 'धोबी पछाड' मारली की नाही ?......"

त्यानंतर वार्डरचें लक्ष जाईपर्यंत तो असाच सारखा बोलत राहिला.

आणि मग एक दिवस तर वाल्ूने आम्हां सगळयांना आश्चर्याचा धक्काच दिला. त्याने सरळच विचारलें,

" बाबू, तुम्ही पुस्तकं वाचत बसतां. वाचा म्हणा, आपलं काय ? अन् त्यांत माझ्या कामाचं कांही निघालं तर ' बेसच ' झालं. नसलं तरी पण मी तुम्हाला सांगतों की तुम्ही मला इथून सोडलं पाहिजे. अवंदाची नागपंचमी मला घरीं पडली पाहिजे. तुम्ही कांग्रेसवाले आतां लवकरच आमच्यावर राज्य करणार असं आमचा 'वाडर' सांगत होता. तसं झालं तर तुम्ही मोठं माणूस व्हा आणि मला सोडून द्या. परवा तुमची वादावादी झाली अन् तुम्ही म्हणालां की ज्यानं सांगितलं त्याच्यावर करणीचा बोल जातो. मग मीं तर बिलकुल गुन्हा केला नाही. माझ्या करणीचा बोल आमच्या गावशिष्टावर जातो. तुमच्या राज्यांत तुम्ही मला कैदेंत ठेवलेलं माझ्या कामास येणार नाही."

" म्हणजे काय ? अरे डाका तूं मारलास ना ? "

" हो. "

" मग तूं गुन्हेगार नाही कसा ? चांगल चक्कं कबूल हि करतोस वर..."

" कबूल करायला काय लाज आहे ? त्या पाटलानं माझी खानदान काढली. माझ्या बापाला चोराचा बाप म्हटलं. मीं तोंडा-

वरच त्या पाटलाला सांगितलं कीं दोन पैसे जवळ आहेत म्हणून लई गमजा करतोस. तुझे पैसेच लुटतो थांब, अन् रात्री बांधला धरून पाटलाला व लुटले पैसे लेकाचे."

तुरुंगाबाहेर असतांना एखाद्या मित्रापासून त्याला बनवून चहा उकळल्यावर ज्या फुशारकीने आम्ही आपल्या कृतीचा वृत्तांत सांगत असूं तितक्या सहजपणें त्याने त्या डाक्याची गोष्ट सांगितली. आमची बरीच मंडळी चिडून गेली होती त्याच्यावर.

" पण वालू, पाटलावर चिडून कां होईना पण तूं डाका मारलास हें खरं आहे. तूं चिडायचं नव्हतं..."

" मग काय, घरीं जाऊन गूळ खोबर खायचं होतं ? आपल्या बापजाद्यांना दिलेल्या शिव्या ऐकून घ्यायच्या ? मला पोटाला नव्हतं म्हणून कांही मीं चोरी केली नव्हती. मला पहिली शिक्षा कां झाली हें पाटलाला माहीत होतं..."

" कां झाली पहिली शिक्षा तुला ? "

" तें मलाहि माहित नाही बाबू ? तुम्ही माझ्या जागीं असता तर तुम्हालाहि झाली असती आणि मीं जें केलं तेंच तुम्हीहि केलं असतं. नसतं केलं तर तुमच्यांत पाणी नाही असं म्हटलं असतं दुनियेनं "

" अरे पण असं केलंस तरी काय तूं ? "

" आमच्या गावपंचाला विचारा. वस्तादजीहि होते त्यांत सामिल."—वस्तादाचें नांव निघतांच त्याने मनोमन नमस्कार केल्यासारखे डोळे मिटले; पण त्याचा राग तसाच होता—" त्यांनी नागपंचमीच्या कुस्तीच्या दंगलासाठी सावकाराच्या पोराशीं माझा जोड लावला. बाबू, न्याय पहा! सोळा वर्सांचा होतों मी आणि सावकाराचा दौलत विसां वर्सांचा होता. वस्ताद म्हणाला—" अरे, डरतोस काय भागुबाई. तुझा बाप वाघाच्या छाताडावर लाथ मारत होता. जरा दंड बैठक, लढत जास्त कर. उद्यापासून तुला ' असली ' पेंच शिकवीन नवे."

" पण बाबू! सावकाराचा दौलत म्हणजे कढी खाऊ बामण नव्हता. तो पंजांत मोठा पक्का आहे. त्याच्या वस्तादानं त्याचं कानशील रगडून रगडून पक्कं केलं होतं. पावभर जवसाचं तेल तो रोज खात होता. दुधांत मुरवलेला आखा नारळाचा डोल सकाळच्या मेहनतीवर आणि पावभर तेलांत भाकर कुस्करून संध्याकाळच्या मेहनतीवर तो खात असे. अन् माझ्या घरीं काय होतं? बाप जंगलांतून गट्ठा आणून विके आणि आईचं निंदण-खुरपण मोलमजुरी. मला रिकामी मेहनत करूं देत हेंच मोठं समजा. मग आमच्या घरीं तेल कुठून येणार? नागपंचमीला अवघा एक महिना होता आणि बाप म्हणाला, ' वाल्यां, कुस्ती खाल्लीस तर लेका, पोरगा म्हणणार नाही तुला माझा.'

" मी दोन चार दिवस विचार केला. सकाळ संध्याकाळ

मेहनत कसरत तर वाढवून बसलों होतों. शुकिर निघाल्यापासून आखाड्यांत जात असे. पोटांत आग भडकल्यासारखं होई. थंड पाणी पिऊन काय दौलतबरोबर कुस्ती जिंकणार होतों मीं ! शेवटीं एका वाण्याच्या दुकानांत गेलों आणि जवसाच्या तेलाचा पिपाच उचलून आणला एक. चांगलं मसकून तेल खायला सुरुवात केली. अंगाला मालिश होतीच. दौलतचा भाव पहावा म्हणून त्याला एकदा चव्हाटयावरच भर बाजारांत छेडला आणि तो आंगावर आला तेव्हां पानाला चुना लावत नाही तेवढयांत शंभर लोकांच्या समोर त्याला चीत केला चारी तक्ते. माझ्या बापानं पाटीवर थाप मारली त्या दिवशीं माझ्या...

" पण काय बाबू ! आमचं कर्म खोटं होतं हो ! दुकानांतून पिपा चोरला म्हणून वाण्यानं पोलिसांत रपोट दिली. मीं पिप्याचा भाव विचारला म्हणून माझ्यावर शक घेऊन पोलिस आला विचारायला. मीं सांगितलं कीं आणला पिपा उचलून. दंगलांत जिंकलों तर पैसे फेकून देईन. पण तो लेकाचा हातच धरायला लागला. म्हणे, ठाण्यावर चल. मग आपण काय समजतों पोलिस बिलीस. त्याच्यांत तर दौलतच्या अर्धीहि ताकत नव्हती. गोष्टीच बहु ! पाडला लेकाला टांग मारून आणि दाखवला त्याला बजरंगबलीचा हिसका.

"... पण एकाचं असं झालं म्हणून सारे पोलीस एक झाले व मला पकडून त्यांनी दिलं सहा महिने बंद करून...

" बाबू, पंचांनी जोड लावला. तेलातुपांतला दौलत कुस्तीला दिला. त्यांच्यावर नाही कां कांही बोल ? पण आम्ही गरीब म्हणून

दिलं मला पाठवून. नागपंचमीहि होऊं दिली नाही. थांबा म्हणावं, आमचेहि दिवस दाखवीलच बजरंगबली! सांगा हो बाबू, जिम्मेदारी माझी की पंचाची?"

त्याचें आणि माझेंहि वार्डर कधी येऊन उभा राहिला तिकडे लक्ष नव्हतें. वालूंच्या पाठींत एक दंडुका बसला आणि "स्वराज्यवाल्यांशी" गोष्टी करतो म्हणून त्याला दंडाबेडी मिळाल्याचें आम्हांला दुसरे दिवशीं कळलें.

वर्धा, ८–६–४६



# वीणा प्रकाशन



| | | |
|---|---|---|
| २. | स्वैरविचार | माडखोलकर |
| ३. | दोन मनें | खांडेकर |
| ५. | आविष्कार | गीता साने |
| ६. | हेमलता | द्वा. वा. घाटे |
| ८. | निष्कलंक | कमल दीक्षित |
| ९. | विशाल जीवन | पी. वाय. देशपांडे |
| १०. | उषःप्रभा | मांजरेकर |
| ११. | झंझावात | बोकील |
| १२. | पहिली लाट | खांडेकर |
| १३. | साकी | बी. रघुनाथ |
| १४. | मुखवटे | माडखोलकर |
| १५. | काळी राणी | पी. वाय. देशपांडे |
| १६. | स्वीकार | शरच्चंद्र टोंगो |
| १७. | आव्हान | माडखोलकर |
| १८. | संक्रमण | वरखेडकर |
| १९. | धूर व इतर एकांकिका | काणेकर |
| २०. | सुखदुःखविवेक | वऱ्हाडपांडे |
| २१. | डाक बंगला | माडखोलकर |
| २३. | हिरवे गुलाब | बी. रघुनाथ |

| | | |
|---|---|---|
| २४. | माझा लढा | ज्ञानसागर |
| २५. | अजिंक्य तारा सर | पां. वि. खांडेकर |
| २६. | दर्यासारंग | आपटे |
| २७. | बाबू दडके | बी. रघुनाथ |
| २८. | वीरारत्नमंजूषा | सावरकर |
| २९. | पाथेय | चोरघडे |
| ३०. | मनमोर | शांताराम |
| ३१. | काका कालेलकर | चोरघडे |
| ३२. | गांधीजी (एक दर्शन) | दादा धर्माधिकारी |
| ३३. | क्रांतिप्रवण तरुण | दादा धर्माधिकारी |